प्रकाशक—र. बा. दिघे
मुक्काम विहारी, पोस्ट खोपोली



चुकांची दुरुस्ती

पान १ ओळ ६ मध्यें शेताच्या दुसऱ्या टोकाला आंब्याच्या झाडा-
खालीं राखणीचा माळा

,, ४२ ,, २ ,, एकदां तसं घडल घडल घडल ॥
असं वाचावं.

,, ८१ ,, १८ ,, आतां. ऐवजीं काळोख पडायच्या आंत

मुद्रकः—स. रा. सरदेसाई, बी. ए., एल्‌एल्. बी., नवीन
समर्थ विद्यालयाचा 'समर्थ भारत छापखाना',
४१ बुधवार पेठ, पुणें २.



# अर्पणा

( राग हमीर )

जय जय जय । जगतजननि ।
जय अंबा । जय भवानि । महाकालि ।
विश्वजननि ॥ महिमा तव भारी ॥ ध्रु ॥

एकवीरा तव भगिनी॥ दोर्घाजणि गिरिवरुनि॥
महाराष्ट्र घेति ध्यानिं ॥ शत्रुप्रतिकारीं ॥१॥
वनवासिनि व्याघ्रांबरि ॥ करिं भाला
खड्ग धरीं ॥
क्षात्रधम जगतिं पसरिं ॥
संकटा निवारीं ॥ २॥

असुरहननिं हास्य अधरिं ॥
कोप नयनिं प्रलयकारि ॥
रगडशि पद दैत्यशिरिं ॥
असुनी सुकुमारी ॥ ३ ॥
शक्तिमया रूपखनी ॥
जगताच्या कल्याणीं ॥
प्रकटसि तूं पाषाणीं ॥
भजतां नरनारी ॥ ४ ॥
नाटक हें मम पहिलें ॥
वरदानीं तूं दिधलें ॥
तुझें तुला अर्पियलें ॥ पूजना स्विका

—कवि रघुनाथ

# उल्हास माला

पुष्प १ लें:—पाणकळा ( आवृत्ति दुसरी छापत आहे. )

| | | |
|---|---|---|
| | | रु. आ. पै. |
| ,, २ रें:—रम्य रात्री | .... .... | १—४—० |
| ,, ३ रें:—वसंतराव आणि चाळीस चोर | | १—८—० |
| ,, ४ थें:—सराई | .... .... | ५—०—० |
| ,, ५ वें:—पूर्तता | .... .... | ३—०—० |
| ,, ६ वें:—आसरा | .... ... | ३—०—० |
| ,, ७ वें:—रानजाई | .... .... | ३—०—० |
| ,, ८ वें:—ताजमहाल | .... .... | २—८—० |
| ,, ९ वें:—गानलुब्धा मृगनयना | .... | ५—०—० |
| ,, १० वें:—माझा सबुद | .... .... | ३—०—० |

,, ११ वें:—सुकुमारी ( लवकरच प्रसिद्ध होईल. )

उल्हास प्रकाशन गृह
विहारी : पो. खोपोली
जिल्हा कुलाबा.

# माझा सबुद

## अंक १ ला

[ कृष्णाकांठीं शाळूचें शेत. नदीच्या अंगाला एका कोपऱ्यांत शेतकऱ्याची पडळ. त्याचे मागें नदीच्या अंगाला निबडुंगाचा फड. त्याचे मागें नदीचें दुहेरी बांकण. नदी-कांठानें मळया, शाळूचीं शेतें, शेवरीचीं झाडें. नदी-पलीकडे लांब अंतरावर डोंगराच्या ओळी. नदीच्या बांकणाच्या एका टोंकाला गांव. पडळीच्या मागें लहनशा टेकाडावर खंडोबाचं देऊळ. पडळीचे समोरील शेताच्या दुसऱ्या टोंकाला राखणीचा माळा. शेजारीं एक खाट. शेतासमोरून पाऊलवाट गेलेली आहे. समय रात्र सरत आल्याचा. आकाशांत तारे चमकत आहेत. माळ्यावर कुणी तरी झोपलें आहे. प्रथम हा देखावा दिसत नाहीं. परन्तु दिशा फांकूं लागल्या कीं एक एक गोष्ट दिसूं लागते. लांब अंतरावरून गाण्याचे सूर ऐकूं येतात. त्या तालावर एक गृहस्थ पाऊलवाटेशेजारीं नाचत आहे. त्या गृहस्थानें आपले हात उपरण्यांत गुंडाळून घेतले आहेत. नेहरू शर्ट, बासकुट, सुरवार, तिरपी गांधी टोपी या पोषाखांत सदर गृहस्थ आहे. तो गाण्याचे तालावर बेहोष होऊन नाचतो व तोंडानें गाण्याचें कडवें पण म्हणतो व शिळेंत वाजवतो. गाणं जवळ-जवळ ऐकूं येऊं लागतं. ]

गाणें:—

देवा, तुझ्या देशासाठीं सोडसी तूं लाज रे ॥ धृ० ॥
हीनदीन अर्धपोटीं ॥
नेसण्या न ज्या लंगोटी ॥
जितेमेले चाळिस कोटि ॥
देवा, अशा भक्तांसाठीं सोडसी तूं लाज रे ॥ १७ ॥

राहि स्वतः ऊपवाशी ॥
भक्त घाली जेवायासी ॥
बंदिशाळा करी काशी ॥
रावणाच्या लंकेमध्यें स्थापि रामराज्य रे ॥ २ ॥

फिरवी चरका चक्रपाणि ॥
सुदर्शन अस्त्रावाणी ॥
सूत काढी, खादी वीणी ॥
नग्न केल्या भारतीची देवा राखी लाज रे ॥ ३ ॥

कटिस पंचा हातीं काठी ॥
लागे इंग्रजांचे पाठीं ॥
वैष्णवांचा जगजेठी ॥
शस्त्रांवांचुन युद्ध खेळे आणण्या स्वराज्य रे ॥ ४ ॥

क्षमा, दया, सत्य, शांति ॥
अहिंसेची महाक्रांति ॥
मानवांची ती उत्क्रांति ॥
दानवांना देव बनवी कलियुगीं आज रे ॥ ५ ॥

[ एक स्त्री एकतारीवर पद म्हणत पुढें येते. त्याच वेळीं पडळींतील कोंबडा 'कुकूचकू' करतो. ]

गृ०:—गरीब प्राण्या, कशाला ओरडतोस ? गेलीं हजार वर्षे रोज पहांटे कंठशोष करून तूं दमलास. परंतु आमची उषा अजून उगवली नाहीं आणि ती उगवेल किंवा नाहीं याची शंकाच वाटते.

स्त्री:—( घाबरलेल्या आवाजांत ) कोण आहे तिथं ?

गृ०:—एक वाटसरू. रस्ता चुकलों असं वाटत होतं मला. पण आपळं

गाणं ऐकलं तेव्हां एकदम कळलं कीं, नाहीं; रस्ता चुकलों नाहीं. उलट आतां वाट सुटली तरी रस्ता चुकणं शक्य नाहीं. इतक्या पहांटे देशाच्या भक्तिरसानं रंगून गाणाऱ्या आपण कोण आहांत?

स्त्रीः—एक अभागी भिकारीण.

गृ०:—धन्य मी! धन्य माझीं श्रवणेंद्रियें! धन्य हें वातावरण आणि धन्य माझा देश! या संगीतानं सगळ्यांना धन्य केलं आहे. वाटतं, एकतारी घेऊन निघावं आपल्यामागं लोकजागृति करीत. (गृहस्थ त्या स्त्रीच्या पायांवर डोकें ठेवतो.)

स्त्रीः—(त्या गृहस्थाला उठवीत) छेः छेः, नमस्कार घेण्याचा हक्क परमेश्वराचा आहे. मानवाचा नाहीं. त्यांत मी पडल्यें स्त्री.

गृ०:—हळू बोल.

स्त्रीः—कां? आणि तुम्ही तरी चोरट्या आवाजांत कां बोलतां?

(गृहस्थ त्या स्त्रीला हातकड्या दाखवतो.)

स्त्रीः—अगबाई! फरारी भूमिगत वाटतं!

गृ०:—तूं कसं ओळखलंस?

स्त्रीः—पायलीचे पन्नास भेटतात वाटेनें खादीच्या झोळ्या घेऊन भीक मागतांना. रागावलांत वाटतं? हाः हाः हाः!

गृ०:—हळूं! समोर शेतकऱ्याची पडळ दिसत आहे. आन् राखणीच्या माळ्यावर पण कुणी झोंपलं आहे.

स्त्रीः—इतके भितां शेतकऱ्यांना? भूमिगत असून? त्यांना भिऊन कसं चालेल? हिंदुस्थानांत नव्व्याण्णव टक्के तेच भरले आहेत. त्यांनीं जर विश्वासाचा घात केला तर......

गृ०:— काय म्हणालीस?

स्त्रीः— विश्वासाचा घात. विश्वासघात. पण दचकलांतसे?

गृ०:— कांहीं नाहीं, उगाच दचकलों.

स्त्रीः—शेतकऱ्यांनीं आमचा विश्वासघात केला तर लोकजागृति करणार कुठं ? आणि कशासाठीं ती करायची ? मी देखील शेतकऱ्याचीच मुलगी आहे. मला शेतकऱ्यांचा अभिमान आहे. शेतकरी कधीं शब्द द्यायचा नाहीं, पण त्यानं एकदा कां सबुद दिला कीं तो मागं फिरायचा नाहीं. शेतकऱ्यांचा समाज जसा मोठा आहे तसं त्याचं दिल पण मोठं आहे. चला माझ्याबरोबर. मी तुम्हांला दाखवतें त्यांचा समाज.

गृ०:—छेः, मला येतां येणार नाहीं. माझी कामगिरी याच भागांत आहे.

स्त्रीः—पण बेड्या तोडल्या पाहिजेत ना प्रथम ?

गृ०:—तुम्ही नका करूं त्याची कांळजी. मी करीन त्यांची व्यवस्था.

स्त्रीः—आम्हाला पण भितां वाटतं ? परंतु आम्ही देखील पन्नास टक्के आहोंत.

गृ०:—तसं नाहीं. परंतु लोखंडाच्या बेडीऐवजीं स्त्रीची बेडी घालून माझी कामगिरी पार पडणार नाहीं.

स्त्रीः—अस्सं. लग्न झालेलं दिसत नाहीं.

गृ०:—झालं होतं पण......

स्त्रीः—पण काय ? बायको मेली ?

गृ०:—छेः छेः !

स्त्रीः—मग काय टाकून दिली ?

गृ०:—तसं पण नाहीं. कांहीं कारणाकरितां तिला सोडून घराबाहेर पडलों.

स्त्रीः—( मोठ्यानं हंसून ) बायका पडतात घराबाहेर. पुरुष नाहींत. कुरूप होती वाटतं ?

गृ०:—छट्. उलट सुंदर होती. तुमच्यासारखीच वयानं न अंगो-ख्यानं पण. ओझरतीच पाहिली होती लग्नांत. तीन सालांपूर्वी एका रात्रें

माझं लग्न झालं व दुसरे दिवशीं सकाळींच वऱ्हाड गेलं. तेव्हांपासून आतां-पर्यंत ती दिसली नाहीं. आतां अगदीं तुमच्यासारखीच दिसत असेल.

स्त्रीः—अरे वा! मोठाच योगायोग! पण अशा सुंदर स्त्रीला टाकून द्यायला कांहीं विशेष कारण घडलं असेल?

गृ०:—अडाणी ढोर होतं अगदीं. माझ्या मनाविरुद्ध मीं लग्न लावलं होतं वडिलांच्या आग्रहामुळं.

स्त्रीः—ज्याला आपल्या बायकोचा उद्धार करतां येत नाहीं तो देशाचा न् जगाचा काय उद्धार करणार? गरीब बिचारी! मला पण नवऱ्यानं टाकलं आहे.

गृ०:—किती विचित्र योगायोग कीं एका परिस्थितींतील दोन माणसांची अचानक भेट व्हावी! पण इतक्या सुंदर गळ्याच्या गुणी न् रूपवान् स्त्रीला टाकून देणारा गाजरपारखी नवरा तरी कोण आहे? कुठला आहे तो न् नांव काय त्याचं?

स्त्रीः—स्त्री आपल्या पुरुषाच्या नांवाचा उच्चार करीत नाहीं.

गृ०:—मग तुमचं तरी नांव सांगा.

स्त्रीः—मी माझं नांव कुणाला सांगत नाहीं. पण आणखी योगायोग जुळतो कां पाहूं या. माझं नांव मंजूळ.

गृ०:—काय म्हणतां? आणखी एक मोठा योगायोग! माझ्या बायकोचं नांव पण मंजूळच आहे.

मं०:—कमाल झाली निर्लज्जपणाची. येतें. नमस्कार.

गृ०:—पुन्हां कधीं भेटीचा योग? (कोंबडा आरवतो. उषेचे रंग पडतात.)

मं०:—वारकरीण आहें मी. आळंदी-पंढरपुरच्या वाऱ्यांच्या निमित्तानं या बाजूला नेहमीं येतें. योग असला तर भेट होईल. पण तुम्ही येतां का तुमच्या या धंद्याबिंद्याच्या निमित्तानं या बाजूला?

गृ०:—मी पण वारकरीच आहें. परंतु पोलिस मला आळंदीला जाऊंच

देत नाहींत. वाटेंतच उतरवून घेतात. येरवडा जेलमध्यें पाठविण्याकरितां. ( स्त्री हंसते. )

स्त्री:—देव तुम्हांला सुबुद्धि देवो न् तुमच्या पत्नीची गांठ लवकर पडो येतें. नमस्कार. ( कोंबडा पुन्हां ओरडतो.) शुभ शकुन. शिरा या पडळींत. ध्यानांत ठेवा माझा सबुद कीं शेतकऱ्यानं एकदां सबुद दिला कीं तो कधीं विश्वासाचा घात करणार नाहीं.

( मंजूळ निघून जाते. गृहस्थ ती गेली त्या दिशेकडे पाहत राहतो. एक शेतकरी पडळीचें दार उघडतो व बाहेर येतो. आळोखे-पिळोखे देतो. उगवणाऱ्या सूर्याला नमस्कार करतो. 'जय सूर्यनारायणा !' म्हणतो. त्याला पाहून गृहस्थ उंसाच्या फडांत शिरतो. शेतकरी माळ्याकडे 'गुंडा गुंडा' अशा हाका मारीत येतो. )

शे०:—गुंडा ! गुंडा ! आळसुटल्या ! ऊठ की. हात मुर्दाडा ! अंगावर उन्हं आलं तरी झोपतुया. आतां किस्नाबांईत बुडी कवा मारनार न् मेहनत कवा करनार ? आरं ऊठ. खंडोबाच्या फडांतली कुस्ती जितायची का हरायची हाय ? ( गुंडाला हालवून जागें करतो. )

गुं०:—दम धर बाइच. ( दुसऱ्या कुशीवर होतो. )

शे०:—जागा व्हतोस कीं नाय ? (तपेलींतलं गार पाणी गुंडांच्या डोळ्यावर टाकतो. 'अग आई, आई' करून गुंडा ओरडत उठतो. उगवत पाहतान् पुन्हां मुरी मारून निजतो. )

शे०:—उठतोस कीं नाय ? (गुंडाला खालीं ओढतो व त्याच्या पेकाटांत लाथ मारतो. ) तुझ्या उमरींत अशी मेहनत करीत होतों व्हय ? ( गुंडा पुटपुटत माळ्यावरून वाळत घातलेला लंगोट हिसकतो. )

गुं०:—( झोंपं भरले डोळे जोरानं उघडीत. ) बाबा, उंसांत खबबतंय काय ?

शे०:—अंः ! डुकराची सारण असेल. (मोठ्यानें ओरडतो. ) खंड्या, पांड्या, शिवा, भिवा, उंः ! कोन बी नाय. वारा हाय जनुं. या बाजाच्या

शेतांत यायची कुनाची छाति नाय. ( गृहस्थ छातीवर उपरणं गुंडाळलेले हात घेऊन पुढं येतो. )

गृ०:—राम राम पाटील. वारा नाहीं. मी आहें.

बा०:—कोन तूं ?

गृ०:—साधा वारा नाहीं मी झुळकीचा. तुफान, वादळ, झंजावात आहें मी. तुमच्या पडळींत मला थोडी भाकर मिळेल काय ? फार भूक लागली आहे मला.

बा०:—आरं जा. मला बी लागली हाय. तुझ्यापुन जास्त.

गृ०:—तुम्हांला कल्पना नाहीं इतकी भयंकर लागली आहे मला.

बा०:—मला पन भयंकर लागलीया. (नाक उडवून श्वास घेतो. ) यल्लीच्या कोरड्यासाचा वास नाय येत ?

गृ०:—तो आला एका कोसावरून म्हणून तर आलों इथं त्या वासावर. म्हटलं पाटलांच्या पडळींत होईल आपली न्याहारी.

बा०:—बारं ऐतोजी ! मी खाऊन तुला राहील तवा तूं खाशील ना ! असं पुष्कळ भामटं पधितल्यात म्या. चल. चालाया लाग.

गृ०:—असं करूं नका. मी तीन दिवसांचा उपाशी आहें.

बा०:—त्येला मी काय करूं ? दिसतोयित्त धट्टाकट्टा. बोलतोयिस बी पोपटावानी. मग पोटाकरतां कामधंदा कां नाय करीत ?

गृ०:—मी माझा कामधंदा रात्रंदिवस करतों. पण पोटाला मिळत नाहीं त्यांत.

बा०:—गांवांत जा. इनामदाराच्या वाड्यांत कांहींवाही लिवण्याचं काम मिळल तुला.

गुं०:—बाबा, दिसतुया कसा पहिलवानावाणी. घे त्येला ठेवून. मला जोड करील कुस्तींत.

बा०:—बारं पहिलवान ! असं मस्त लफंगे पाहिल्याती म्यां. सोंगंढोगं

करून येत्यात टेहळाया. साळसुदपनानं काय म्हंगतो पन बेटा! काम करतो दिवसन् रात पन पोटाला नाय मिळत!

गृ०:—पोटाला कांहीं मिळतं कीं नाहीं हें पाह्यला मी जातों कशाला? जेव्हां पोट फारच तक्रार करतं तेव्हां मी त्याचा विचार करतों.

गुं०:—आर तुझ्या! बाबा, लई गंमतीखोर दिसतो ह्या मानुस. याला ठेऊनश्यानी घ्येच.

बा०:—थांब वाईच. ये तुफान्या, आळश्या, पोटाचा धंदा करतूस पन पोटाला मिळत नाय म्हंगतूस. पोट तक्रार करीस तंवर त्येचा इचार करीत नाहींस असं बी म्हंगतूस. असा तूं ह्यायीस तरी कोन?

गृ०:—सेवक. पुजारी.

बा०:—पन देव कोन तुझा?

गृ०:—जन्मभूमि.

गुं०:—जनामभूमि! जाखाई, जोखाई, कान्हाई, रानाई, मरीआई माहित ह्यायती मला. पन ही जनामभूमि कोन ह्याय बा?

गृ०:—माझी आई. तुझी आई. तुझ्या बापाची आई. आपल्या सर्वांची आई. सर्व आयांची आई. मोठी आई आहे ती. तुझ्यासारखीं चाळीस कोटि लेकरं आहेत तिचीं.

गुं:—चाळीस कोटि म्हंजी किती इसा?

गृ०:—( हंसतो. ) गुंडा! गुंडा! खरोखरीच गुंड आहेस तूं! कुठंच कोपरा नाहीं तुला. चाळीस कोटि म्हणजे किती इसा? कसं सांगूं तुला? पांच इसा म्हणजे शंभर. असे दहा शंभर म्हणजे एक हजार. असे शंभर हजार म्हणजे एक लाख. असे शंभर लाख म्हणजे एक कोटि. अशा चाळीस कोटि.

गुं०:—बबब! इकती पोरं ह्यायती तिला!

बा०:—आन् आम्ही कशी नाय पाहिली तिला कीं आयकलं न तिच्याबद्दल?

गृ०:—अरेरे, कोण हें अज्ञान ! ज्यांना स्वातंत्र्यन् स्वराज्य मिळवून द्यायचं त्यांना आपल्या जन्मभूमि आईची कल्पना पण नसावी ! मग हे लोक तिच्याकरतां प्राण कसे खर्ची घालतील ? आणि आत्मबलिदान कसे करतील ! उगीच नाहीं आमच्या आईची अशी स्थिति झाली. अंगाला कपडा नाहीं, पोटाला खायला नाहीं. भिकारीण झाली आहे अगदीं ती !

गुं०:—तिचीं चाळीस कोटि लेकरं असून !

गृ०:—होय. कारण तीं तुमच्यासारखींच नामर्द आहेत ना !

गुं०:—आपुन नाहीं बा नामर्द म्हनवून घेनार.

बा०:—आपुन बी नाय. या गुंडा सारी धा प्वारं झालीं मला.

गृ०:—तरी जोंपर्यंत तुम्ही आपल्या आईचे पांग फेडीत नाहीं, मर्दुमकी करीत नाहीं तोंपर्यंत तुम्ही नामर्दच !

बा०:—बरा म्हईन ! मर्द हाय मी. ( दंड थोपटतो. ) भगत हाय मी मल्हारी मार्तंडाचा. ( दंड थोपटतो. ) कष्ट केल्याबिगार खात नाय मी. ही माझी आई धरतीमाता. या आईचं कष्ट करतों मी. ही पन मला पोटाला भाकर देते. जय मल्हार ! ( दंड थोपटतो. )

गृ०:—जय हिंद. मी म्हणत होतों तीच ही. जी तुझी आई तीच माझी आई–जननी जन्मभूमि. तिची पायधूळ तो माझा अंगारा. या, लावा कपाळाला. (गुंडा धूळ उचलून त्यांच्या कपाळाला लावतो. बाजा धुळीच्या मुठीच्या मुठी उचलून आपल्या, गुंडाच्यान् विश्वासच्या डोक्यांत घालतो व मोठ्यानें हॉः हॉः हॉः करून ओरडतो. )

गृ०:—बाजा, मी पण मर्द आहें. माझ्या अंगांत गरम रक्त आहे. टोणग्याचं बळ आहे. नांगराचा फाळ घालून शेषाची टाळू फोडीन मी. जय मल्हार ! जय हिंद ! ( हातांतील कड्या तोडतो. )

बा. गुं०:—( एकदम ) जय मल्हार ! ( पवित्र्यांत कुस्तीची सलामी घेतात. दंड पिटतात. ) जय मल्हार ! जय मल्हार ! ( जोरानं ओरडतात. ) बारं ! मर्दा, बा ! ! जय मल्हार.

गृ०:—( हंसून ) जय हिंद !

बा० गुं०—-जय हिंद !

य०:—( पडळीच्या दारांत येऊन ) अवं झालं काय जय मल्हार जय हिंद करायास्नी ! खंडोबाचं वारं आलं अंगांत जनु. भंडार आनूं काय ?

बा०:—येल्ली, चार भाकऱ्या उजून टाक. पावनं हायती. मोठं मानाचं मानकरी हायती. पळ-पळ ( येल्ली आंत जाते.) गुंडा, नीट पघुनशानी ठेव. यास्नी हातकड्या म्हंगतात. ही मर्दाची कामं हायती. तुझं नशीब लई थ्वार. म्हून तुला या उमरींत फरारी दिसला. जा. तुझ्या आइशीला सांग कोड्यांस नू भाकऱ्या बेगुन आन. ( गुंडा पडळींत जातो. )

गृ०:—चार भाकऱ्या काय करायच्या ? चतकोर भाकरी नू चटणी लाखा ठिकाणीं आहे आज.

बा०:—वः तुफानराव ! असं कसं व्हईल ? आज बाजाची दिवाळी हाय. दसरा हाय. आज साधुसंत त्याच्या घरीं चालून आल्याती. मघां मी तुम्हास्नी उणं अधिक बोललो तें संमदं नाटक व्हतं. खरं सांगुं ! आनू तुम्ही जानलं असलच कीं हथं कोणी फार येवजाव केली कीं आम्हास्नी खपत नाय. राग धरूं नगा हं. गुंडा, भाहिर ये.

[ गुंडा बाहेर येतो व त्या गृहस्थाला धोतर पैरण देतो. ]

गुं०:—पाव्हन, त्या झाडाच्या आड कापडं बदला. ( गृहस्थ कपडे बदलण्यास पडद्यांत जातो. गुंडा बाजाला कानस देतो. )

बा०:—हें काय ?

गुं०:—-पाव्हन्याचं दागिनं कानसाया नग ?

बा०:—शाबास, गुंडा. बाजाचा पोरगा हायिस खरा. गुंडा, मारुती हलवाइकडं धांवत जा आनू शेरभर मिठाई आन. ( गुंडाला पैसे देतो. )

( पाव्हणा कपडे बदलून आपल्या कपड्यांचं गाठोडं घेऊन येतो. गुंडा गाठोडं पाव्हण्याच्या हातांतून हिसकावून घेतो व निघून जातो. )

बा०:—गुंडा. गुंडा. ( पडद्यांतून गुंडाः—ठावं हाय. ठावं हाय. )

गुंडा. गुंडा. पाव्हन्याचं गठुडं ( लांबून गुंडाः—ठावं हाय. ठावं हाय. ) गुंडा गठुडं चंदर डोहांत टाक. गेला वाटतं बावराच्या पल्याड. काय कारटा बांड आहे. पाव्हनं, या हथं बसा. ( घोंगडी हांथरतो. दोघेहि घोंगडीवर बसतात.) हात द्या हकडं. हं हं हं आतां कसं ? ( कडी कानसूं लागतो. ) आतां होऊं द्या जरा गप्पागोस्टी. जरा हालहवाल बी सांगा.

गृ०:—कुठली ?

बा०:—आपली तकडली. ( गृहस्थ बुचकळ्यांत पडतो.) अवं तकडली आपली !

गृ०:—म्हणजे कुठली ?

बा०:—अवं आपल्या मंदीराची.

गृ०:— (हंसून) खरंच ! मंदीर ! मंदीर ! अगदीं योग्य आहे नांव.

बा०:—अशा चाळवाचाळवीनं बाजा फसनार नाय. कोणत्या जेल-मधून पळून आलांत, कोणत्या जेलमंधि व्हतां. होऊं द्या कीं एकदां बातचीत.

गृ०:—मी आलों त्या ठिकाणाचं नांव " स्वातंत्र्य मंदिर ".

बा०:—काय थापा मारतां. मीं बी मस्त जेल पाहिल्याती.

य०:—( बाहेर येऊन ) अवं असं काय बडबडतां परक्या मानसाम्होरं ?

बा०:—ह्ये काय परके हायती ? आपल्याच जातीचं हायती.

य०:—ह्यो काय रामोशी हायती ?

बा०:—आन् आपुन काय रामोशी हाय ? पाटील घरानं हाय आपलं म् रामोशी काय म्हंगतेस !

गृ०:—बाबांनो, मी रामोशी आहें, बेरड आहें, दरोडखोर आहें. परंतु तुम्ही भांडूं नका.

बा०:—जाऊं द्या हो. तें आमचं नवराबायकोचं भांडण हाय रोजचं. पन तुमच्या मंदिराचं नांवगांव सांगाल कीं नाय ?

गृ०:—माझं स्वातंत्र्यमंदिर म्हणजे महात्मा गांधी व इतर देशभक्त यांच्या वास्तव्यानं पुनीत झालेला येरवडा जेल.

बा०:—हाः हाः हाः ! येरवडाजेल फोडला तुमी ! हाः हाः हाः ! तुफान-राव, बहादूर हायती तुमी ! बेस्. बेस्. त्या सुकड्या सायबाचं आन् त्या पिंग्या मिशीच्या सायबाचं नाक कापलंत तें चांगलं केलंत. पन कायव्हं, तो बेडुक हाय कीं गेला पेन्सिलींत ?

गृ०:—कोणता बेडुक ? तो पांढऱ्या केसांचा काळा बिब्बीकर ?

बा०:—व्हय. व्हय. तोच तो ढुंगणासा काळा जेलर.

गृ०:—पण तुम्हांला काय माहिती त्याची ?

बा०:—असं काय करतां ? येरवड्यांत मीं पांच वरसं काढली कीं राया.

य०:—कारभारी, येड लागलंया जनुं तुमास्नी ?

बा०:—घरांत जा. घरात जा. भाकर करपल.

गृ०:—बिब्बीकर आतां विसापूरला बदलून गेला आहे.

बा०:—पन कतीक झालं तरी तो ठान्याच्या सटवाजी हवालदाराच्या खालींच. तुमी व्हता कधीं ठान्याला ?

गृ०:—सरकारनं अद्याप आम्हांला तिथं पाव्हणेर केला नाहीं. नाहींतर आम्हीं ठाण्याची पण हवा खाल्ली असती.

बा०:—हवा म्हनाल तर बस्स नासिक जेलची. पन तिथं तसदी लई. आपल्या येरवड्यासारखा आराम नाय कुठं.

गृ०:—तुम्हीं ठाण्याला होतां न् नासिकला पण होतां कां ?

बा०:—अवं असं काय करतां? (गृहस्थाच्या मांडीला हातानं डिवचून) ठान्याची तर माझी पहिली शिक्षा.

गृ०:—ठाण्याची तुमची पहिली शिक्षा ! अस्सं !

बा०:—व्हय ना. जयकरसायबानं दोन वर्ष ठोठावला होता मला.

य०:—कारबारी, उठा. पाव्हन्यास्नी पाणी द्या हातपाय धुन्यास्नी.

(पाण्याची तपेली ठेवते.)

बा०:—थांब बाईच. ठान्याहून मी खाडींत उडी टाकून पळालों न्

मोगलाई गाठली. थतं हैदराबाद जेलमंधी तीन वरसं काढलीं. एक इसा न् एक शिक्षा हायती माझ्या रिकाटला.

गृ०:—टाण्याची तुमची पहिली शिक्षा. तिथं जेलमधून खाडींत उडी टाकून तुम्ही फरारी झालांत. ठीक. तुमची दुसरी शिक्षा हैदराबादची. तिथून पुढं नासिक, विसापूर न् येरवडा. बरं पण भोरच्या जेलमधें होतां कधीं!

बा०:—तुम्हांला काय माहीत ? ( बाजा घाबरल्यासारखा दिसतो. )

गृ०:—मी होतों त्या जेलमध्यें म्हणून सहज विचारलें.

बा०:—अस्सं होय ?

य०—पाव्हनं, यांचं काय घेतां मनावर. गांजा पिवून डोक्सं फिरलंया यांचं.

बा०:—येडी येली. अग, ते फरारी. आपुन फरारी. ते कसा बभ्रा करतील आपला! हें बघ मानसाच्या हातून चूक व्हते. म्हून जनामभर ती उगाळू नाय. आपनाकडंच बघ कीं! उमाजीच्या बंडांत आमचं कर्तुक संपलं. आमची हार तथून सुरू झाली. तवापून चोऱ्यान् दरोडं, मागं लागले ते कायमचें. एक गुन्हा छपवायला धा गुन्हे कराया लागत्यात. एकदां चोर तर जनामभर चोर. तसंच यांचंबी झालं असेल. समजलीस! आपुन मानसाचं पानी उतरवूं नाय. भाकार खाली कीं जातील आपला जीव सांभाळीत किस्नाबाईच्या पल्याड. मी करीन त्यांना सोबत न् कोल्हापूर हद्दींत काढून लावीन.

गृ०:—नाहीं पाटील, मी याच हद्दींत राहणार. इथंच माझं काम आहे. भुकेबरोबर मला झोंपेनं पण ग्रासलं आहे. रात्रभर मला तुमच्या आसऱ्यांत विसांवा द्या. फार झालं तर मी घरांत झोंपणार नाहीं. झाडाखालीं दिवस काढीन.

बा०:—तें काय बी चालनार नाय. तूं फरारी. मी फरारी. आपुन एकमेकांच्या खुना जानल्या पाहिजेत. तुझ्यामुळ काळे कुत्ते माझ्या पडळीवर येतील न् माझं बिंग भाहिर काढतील. तूं पोटभर खा. पाहिजे तेवढं बरोबर घे न् चालाया लाग. मी आज तुला हथं वस्तीला अस्रा ठेवनार नाय.

गृ०:—पाटील, असं काय करतां !

बा०:—तें काय नाय. तूं ही शीव सोडलीच पाहिजे. ( गुंडा धांवत येतो. ) गुंडा, मिठाई नाय आनलीस ?

गुं०:—बाबा, मी हतून पाव्हन्यांचा माग बुजवीत गेलों चंदर डव्हावर. तथं गठुडं डव्हांत टाकलं. तों जिरग्या रामोशी आला पाव्हन्यांचा माग काढीत. तो म्हंगाला काळ्या कुत्र्यांची पार्टी गांवांत घर न् घर धुंडीत हाय फरारीकरतां. तवा मीं त्येला काय सांगायचं त्ये सांगितंल न् डोळा घालुनशानी आलों.

बा०:—पाव्हनं, आतां मातुर फास माझ्या गळ्याशीं आला. आतां बेगीबेगी भाकार खाउनशानी घ्या. दोन भाकरी जास्त खा. आन वाटल तेवढ्या संगं पन घ्या. मातुर आमांला सोडवा.

गृ०:—उमदे पाटील, आतां कशाला तुमची भाकर संपवूं ? लॉकअपमध्यें मला ती सरकारी खर्चानं मिळेल. तुम्ही सरळ गेटावर जा न् माझी बातमी द्या. म्हणजे सरकारकडून इनाम येईल.

बा०:—पाव्हनं, मीं दरोडे घातल्याती. खून केल्याती. पन इस्वासाचा गैर इस्वास नाय केला कुनाचा. ह्ये पाप लई वंगाळ हाय.

गृ०:—बाजा निंबगांवकर ?

बा०:—( घाबरून ) कुनी हांक मारली मला !

गृ०:—मी.

बा०:—कोन ! इस्वास ! माझ्या बळी पाटलाचा इस्वास ? तुझ्या संगं बोलतांना मला सारखी त्याची सय येत होती.

वि०:—माझे बाबा लहानपणीं तुझ्या गोष्टी सांगत न् तुझ्या पराक्रमाचं वर्णन करीत, त्यावरून न् तुझ्या भाषणावरून मीं तुला ओळखलं.

बा०:—पांच सालं झालीं. बळी मला वडगांवच्या बाजारांत भेटला. त्यानं मला वळखलं. इस्वासाला संगं कां आनला नाय म्हून मी त्येला इचारलं. तवा त्यो म्हंगाला कीं तूं पुन्याच्या कालिजांत शिकत हायिस. झाली तुझी शेवटची परीक्सा ?

वि०:—मीं वकीलीची पण परीक्षा दिली.

बा०:—तरी तूं ह्या फंदांत पडलास ? पोरा काय केलंस ह्ये ! बापाच्या नांवाला काळं फासलंस !

वि०:—नाहीं फासलं. बापाचं नांव उजाळलंन् तुझं पण उजळीन. सह्याद्रीच्या खडकावर सोनं घालून कोरीन.

बा०:—इस्वास, तुझ्या बापानं लाख वेळां मायेचं कांबरुण घालून मला वाचवलं. मी ल्हान व्हतो तवा तुझा आजा रामोसवाड्यांत आला न् त्यानं रेवड्याफुटाण्याला मला पैसा अवेला दिला नाय असं कधीं झालं नाय. पिढ्यान् पिढ्या नमक खाल्लं हाय आम्हीं तुमचं. मी न् माझ्या वाड-वडिलांनीं पायरी वेंघली हाय तुमची. तुझ्या आईन आपल्या हातानं मला दूधभात जेऊं घातला तो अजून हाय या देहांत. मी तुमच्याशीं बैमान व्हनार नाय. आम्ही रामोशी गरीब. आमच्याजवळ तुमास्नी द्येया काय हाय ? काय बी नाय. फकास्त सबुद हाय. इमानाचा सबुद.

गुं०:—व्हय. सबुद. अक्षि सबुद.

बा०:—किस्नाबाई वाट बदलील, इकडचा डोंगर तकडं व्हईल. सूर्य-देव मावळतीला उगवल पन रामोशाचा सबुद बदलायचा नायं. आमच्या पराणाला आधीं धक्का लागल मग तुमच्या केसाला.

गुं०:—व्हय ना. आपुन दरोडं घालूं. डाकं मारूं. पन इरनार नाय कुनाला. माझा सबुद खोटा झाला तर जीभ कापून देईन.

बा०:—त्ये होत नसल तर खुशाल ऱ्हा माझ्या मळींत. इनामदार माझा लागू भागू हाय आन् मी त्येचा हाय. त्येला मी सांगन माझ्या गांवचा रामोशी हाय म्हून. मातुर रामोशाचं स्वांग बराबर आनलं पाहिजे.

वि०:—तें माझं काम.

बा०:—मग काय बी धास्ती नाय. आतां शाळू आलाय हुरड्यावर. कर मेहनत सुरू. रेड्यावानी शरीर होया व्होवं. गुंडा तुला दोन म्हशींचं दूध देईल.

गुं०:—दोन सोडून चार म्हशींचं प्याबा कीं. आपल्यास्नी दुधाचा तोटा नाय.

वि०—–मला तर इथं एकच रेडुक दिसतय.

बा०:—गुंडा एका रेडकावर सात म्हशी पाजील. किस्नाकांठाला म्हशींना काय तोटा ?

( विश्वास हंसतो. )

गृ०:—बाबा, त्ये बघ म्हांळ उठलिया जनु.

बा०:—पोलिसासंगं नरसिंगराव पन हाय.

वि०:—कोण नरसिंगराव !

बा०:—या गांवचा इनामदार. सरकारनं त्येस्नी रावभादूर केलंया. सरकारांत मोठा मान हाय त्येचा. अंमलदार लोक त्येच्या बंजळीबिगार पानी नाय पेत.

वि०:—रावबहादूर नरसिंगराव ! नरसिंगराव ! नरांतले सिंह ! आन् त्यांच्यांतले हे राव ! नीच, पाजी, हलकट. आमच्या समाजाचा काळिमा आहे तो. त्यानं आमच्या समाजाच्या तोंडाला डांबर फासलंय. ज्या दिवशीं आठ ऑगस्टला राष्ट्रसभा इंग्रजांशीं लढा कसा द्यावयाचा याचा विचार करीत होती, त्या दिवशीं हा हरामखोर कमिशनरच्या बंगल्यावर आपल्या आईचा सौदा पटवीत होता.

बा०:—धनी, शान्त व्हा. वाइट वखत आलाय तेव्हढा जाऊं द्ये. तोपर्यंत सबुर करा न् वाइच त्या साबरांत जाऊन लपा. गुंडा वाट दावील.

वि०:—पोटांत भाकर गेल्याशिवाय आपलं नाहीं बुवा डोकं शांत होणार न् पाय पण पुढं पडणार. माझे यल्ली आई, पान वाढ पाहूं. मग काय व्हायचं असेल तें होईल.

बा०:—धनी, तुम्ही मराठं न् मी रामोशी. माझ्या हातचं तुमाला कसं चालल ? हे किटाळ गेलं कीं यल्ली चौका सारवून देईल. गुंडा गोडा-

घडाचं आनील. आन् मग निवांत जेवनखान करा. व्हा म्होरं. वढयांत आलं ते.

**वि०:**—येऊं देत. मला लागलीय रगडून भूक. तुझ्या काळ्या कुत्याकरितां पोटपूजा थांबवूं ? ( तोन् यह्री पडळींत जातात. )

**बा०:**—जलदी भाकर खा न् माझ्या न् गुंडाच्या वाटणीच्या पन घेऊन मागल्या दारानं पसार व्हा. तंवर मी पोलिसांना बोलून गुंगत ठेवतों. ( बाज्या गुंडाच्या कानाशीं लागतो, गुंडा पडळींत जातो. )

**बा०:**—( धोंडा उचलून झुडपांत फेकतो. ) अरं हाड्. हाड्. हाड्.

**रा. ब.:**—बाजा, लेकाच्या धोंडं कुणावर फेकतोस ?

**बा०:**—तुमी हाय व्हय. मला वाटलं कुतरडीं आलीं जनु.

[ माने फौजदार, शिपाई, रावबहादूर नरसिंगराव पुढें येतात. माने बाजाच्या व गुंडाच्या थोबाडींत देतो. दोघांना बडवबडव बडवतो. ]

**मा०:**—माझी चेष्टा ! माने फौजदाराची चेष्टा ! अजून माने फौजदाराची भरमाप्पान् सुंदरी बघितली नाय तुम्ही. ती बघा एकदा म्हणजे रडाल. रडाल ! तुम्हाला काय कुतरडी वाटलों आम्ही ? हरामखोरांनो, गाढवांनो, हलकटांनो, बोला. कुठं आहे फरारी ? (लाथा बुक्क्या मारतो ) लकडीशिवाय मकडी वळत नाहीं. ( त्यांचे कान उपटतो. ) माकडांनो, बोलत कां नाहीं ! काँग्रेसची लांच खाऊन फराऱ्याला लपवून ठेवतां ? ठेवा. खुशाल ठेवा. ( त्यांचे कान पिरगटतो. कान ओढीत बोलतो. ) मी माने फौजदार तुमचीं पाळंमुळं खणून काढीन. काँग्रेसची तिरडी बांधीन. माझ्या हातून फरारी जाईल ! बिशाद आहे. वीस वर्षांत एक फरारी नाहीं माझ्या रिपोर्टांत. रावबहाद्दूर, पाताळांतून धुंडून काढीन मी त्याला. चहूंकडं संगीन गोटं बसवली आहेत. वाऱ्याला वाट नाहीं ठेवली मी. मुंगीला देखील पासपोर्ट मिळणार नाहीं माझ्याकडून. माहित आहे माझा पोलिशी दरारा ? ( कान पिरगाटतो ). भरमाप्पा. सुंदरी.

**बा. गुं०:**—व्हय. व्हय. ऐकून म्हाहित हाय.

**मा०:**—खोटं बोलतां, साल्यांनो. कधीं रे ऐकलंत ? हा तालुका सगळ्या

तालुक्यांत डांबीस तालुका, कॉंग्रेसचा बालेकिल्ला, म्हणून चीज साहेबानं रेकमेंड करून माझी तारेनं बदली केली. मग तुम्हाला रे माझी काय माहिती? नीट ऐका. फरारी मिळवून दिला नाहीं तर हाडं रगडून काढीन.

बा०:—तो मिळतो आमच्या बाला. अवं फरारी म्हंजी वादळ, वारा, बावटळ !

मा०:—ब्रिटिश सरकारचं राज्य आहे. त्यांत हुकमाशिवाय पान नाहीं हालायाचं. या त्यांच्या यंत्रांत असे कैक फरारी रगडून काढले आहेत मीं. सगळ्यांना धूळ चारणाऱ्या इंग्रजांचा फौजदार आहें मी. ध्यानांत ठेवा.

बा० गुं०:—( मुंडाशी हालवून ) व्हय. व्हय.

रा. ब०:—बाजा, लेका, फार अक्कल चालवूं नकोस. एक फरारी कैदी तुरुंगांतून सुटला आहे. त्याच्या चौकशीला मानेसाहेब आले आहेत. वाटेल तें झालं तरी फरारी सांपडून दिला पाहिजे आपण.

मा०:—साधा फरारी नाहीं तो !

बा०:—चोर हाय जनुं ?

मा०:—छे :

गुं०:—दरोडखोर हाय जनुं ?

मा०:—त्याच्याहून भयंकर.

बा०:—त्याच्यापुन भयांकार ! खुनी हाय जनुं ?

मा०:—अंहः त्याच्याहून भयंकर.

बा०:—चोर, दरोडखोर, खुनी यांच्यापून कोन भयांकार हाय या दुनियेत ?

मा०:—कॉंग्रेसवाला.

बा०:—हे असेच ना? (एक जटाधारी गृहस्थ पाऊल वाटेनें जातात. )

मा०:—अहो गांधी टोपी, कॉंग्रेसजन !

रा. बा०:—महाशब्दे नांव आहे त्यांचं. काळाबाजार करून गडगंज पैका केला आहे त्यांनीं.

मा०:—अहो महाशब्दे, अहो महाशब्दे ! (महाशब्दे परत येतात.) गांधी टोपी, कॉंग्रेसजन, काय शिव्या वाटल्या तुम्हाला ?

महा०:—(विनयानें नमस्कार करीत) घरीं बाडबिस्तरा बांधून तयार आहे. आपण सांगाल तिथं, सांगाल त्या वेळेला हजर राहीन.

मा०:—तें मागाहून पाहूं.

महा०:—पण आपल्याला तखलीफ होईल ना ! माझ्याशिवाय या गांवांत टांगा नाहीं कुणाचा. रावबहाद्दुरांची मोटार आहे फक्त. म्हणतों तुमची पण सोय होईल तालुक्यांत जायची. अहो, परपीडा म्हणजे हिंसाच. तुम्हाला त्रास देऊन आम्हाला काय मिळणार ?

मा०:—भयंकर काळजी करतां बुवा आमची. मग तो तेवढा फरारी पकडून आणाना.

महा०:—कोण फरारी ?

मा०:—वः जसं काय माहितच नाहीं. अहो तुमचा मित्र विश्वास-बाळ पाटील !

महा०:—माझा मित्र ! मी त्याला ओळखतसुद्धां नाहीं.

मा०:—अहो सगळे कॉंग्रेसजन म्हणजे एकमेकांचे मित्रच. तुमच्याच आधारावर तो इकडं आला.

महा०:—हें पहा. माझा शब्द म्हणजे शब्द. तो कधीं खोटा होणार नाहीं. मी तुमच्या फराऱ्याला काळा कीं गोरा पाहिला नाहीं. शिवाय कोणीहि हिंसावादी कॉंग्रेसजन होऊं शकत नाहीं. सत्य न् अहिंसा आमचा धर्म.

मा०:—सोईचा आहे धर्म. एकाचे दोन खोटं माप, तिरपा गज नाहीं पाप. सुपडा साफ गळा काप. काळ्या बाजारांत सगळं माफ. पण ध्यानांत ठेवा. फरारी सांपडून दिला नाहीं तर काळाबाजार उलटा करीन. मला माने फौजदार म्हणतात.

महा०:—परवानगी ? (नमस्कार करतात.) प्रभातफेरीला उशीर होईल.

मा०:—- तालुक्यांतल्या वकिलाला वकीलपत्र देऊन ठेवा 'अ' वर्गाकरितां. बरं कां !

( महाशब्दे विनयानें नमस्कार करतात व जातात. )

मा०:—न्यायी न् गरीब इंग्रज सरकार आहे म्हणून या लोकांच्या गमज्या. म्हणे अहिंसा! सत्याग्रह ! 'अ' वर्ग! 'ब' वर्ग! काय एकेक थेरं ! दुसऱ्या कोणाचं राज्य असतं तर दाखवला असता इंगा.

रा. ब०:—फार कशाला ? या इंग्रजांनीं 'चलेजाव' करूं द्यात म्हंजी हेच आमचे लोक आम्हाला त्राहि भगवान् करून सोडतील.

मा०:—आन् इंग्रज एडनाला पोंचण्याच्या पूर्वीं त्यांना परत बोलवावं लागेल.

रा. ब०:—मग आमच्या स्वराज्याची होईल म्युनिसिपालटी नाहीं तर लोकलबोर्ड. मानेसाहेब, हा फरारी मराठा आहो. त्यानं काळं फासलं कीं हो आमच्या तोंडाला !

बा०:—धनि, कुठं ? ( धोतराच्या टोकानं रावबहादुराचं काळं तोंड पुसावयास जातो. )

रा. ब०:—जन्मांत जायचं नाहीं तें.

मा०:—पण मी माने फौजदार कर्दन काळ जिवंत आहें. घंटीचोर, मांगगारोडी, बैरागी, गोपाळ, बेरड, कैकाडी...

गुं०:—आन् रामोशी ?

मा०:—रामोशी पण चळचळां कापतात मला. या कॉंग्रेसचे तारखात्यांतहि हस्तक आहेत म्हणून तार मला चोवीस घंटे उशीरां मिळाली. नाहीं तर त्या बेरडाच्या आतांपर्यंत मुसक्या आवळल्या असत्या न् पाठीची चामडी लोळवली असती.

रा. ब०:—बाज्या, तो फरारी माझ्या इनाम हद्दींत शिरलाय. त्याला पकडून सरकारच्या हवालीं करणं आपलं काम आहे. शिवाय जो कोणी त्याला पकडून देईल त्याला सरकार पांच हजार रुपयांचं इनाम देणार

आहे असं जाहिर झालं आहे. पाहिलास कुठं त्याला ? आहे कुठं त्याची बातमी ?

बा०:—चोर, दरोडखोर, खुनी बघितल्याती म्या. पन राजाच्या इरुच बंडावा करनारा नाय पघितला. तुमचा मानुस दिसाया कसा हाय ?

मा०:—अगदीं रामोशी-मांगगारोड्यासारखा.

बा०:—तसं नाय इचारित मी. त्येची उंची कितीक हाय ? जाडी कितीक हाय ? म्हंजी वळखाया बरं. नाय तर आपुन जावं चोर म्हून त्येला धराया न् तो निंगावा साव, आन् त्येनं फोडावं आमचं तोंड खेटरानं.

मा०:—हे बघ बाजा, दिसायाला तो अगदीं माझ्यासारखा आहे.

बा०:—म्हंजी कसा ? रामोशावानी का मांगगारोड्यावानी ?

रा. ब०:—बाजा, गाढवा, कुणाची चेष्टा करतोस ?

बा०:— साहेब म्हंगत व्हते आतां तेंच मी बोललों.

मा०:—रावबहाद्दूर, तें जाऊं द्या. त्याचा गैरसमज होणं शक्य आहे. बाजा; तो फरारी उंचीला, जाडीला न् तोंडवळ्यांत अगदीं माझ्यासारखा आहे. माझ्या मिशा जास्त रुबाबदार न् तो आहे मेखाड्या. माझं शरीर जास्त ढंगदार न् कसलेलं आहे. माझ्या चालींत लष्करी थाट आहे. आन् तो दिसतो अगदीं बेंगरूळ. आतांच महाशब्दे गेले न् त्यांच्यासारखा.

बा०:—आन् कपडे कसं हायती त्येचं ?

मा०:—खादीचे कपडे आहेत त्याच्या अंगांत.

बा०:—खादीचीं कापडं घातलेला एक बाबा आलाय या बाजूला.

रा. ब०:—बाजा, कुठं ? कुठं ? जलदी सांग.

बा०:—पन त्याच्यान् फौजदारसाहेबांच्या खुना नाय जमत.

मा०:—पण खादीचे कपडे होते न् त्याच्या अंगांत ?

बा०:—व्हय. व्हय.

मा०:—मग तोच तो. अगदीं शंका नाहीं. जातो कुठं साला माझ्या हातून. उंदरासारखा सांपळ्यांत पकडीन मी त्याला.

बा०:--पन तो कुठं न् फौजदारसाहेब कुठं ! जमीन आस्मानाचं अंतर.

मा०:--कोणता साला नाहीं म्हणतो !

बा०:--घाटदार पोटऱ्यांवर तंग सुरवार अंगसर दाटली व्हती त्येच्या.

मा०:--बस्स. नक्की तोच.

बा०:--वर घोळदार पैरण, ढंगदार कुडतं न् त्येवर तिरपी पांढरी टोपी.

मा०:--बस्स. बस्स. एकदम त्याचंच वर्णन. आतां त्याची चामडीच लोळवितों.

बा०:--कावळ्याच्या परावानी काळेशार केस न् त्यांतून गव्हळींतली पायवाट असा भांग.

मा०:--रावबहाद्दूर, शुभ शकुन. द्या टाळी. कबुलीजबाबाकरितां कधीं चाप लावीन त्याला असं झालं आहे मला.

बा०:--बांधा तरी काय, जसा चंदनाचा रांधा. आन चाल तरी काय जसा ढाण्या वाघ निगालाय शिकारीला.

मा०:--रावबहाद्दूर, शेक हँडस्. हात नुसते शिवाशिवत आहेत त्याला बदडून काढायला. बाजाचं वर्णन ऐकून भरमप्पा न् सुंदरीजोगा गडी दिसतोय.

बा०:--रूप तरी काय ! नळदमयंती चित्रांतला सरदारच जवानमर्द.

मा०:--हुर्रे. फरारी सांपडलाच. ( रावबहाद्दुरांना आलिंगन देतो.)

बा०:--पन तुमच्या न् त्याच्या मिशांत लई फरक.

मा०:--कबूल. माझ्या मोठ्या तर त्याच्या बारीक.

बा०:--त्याचं इंगळीचं आकडं चढल्यावानी तर तुमच्या झुरळावानी लांब.

रा. ब०:--बाजा, हरामखोरा, वर्णन सगळं जुळलं. पण तो तुला दिसला कुठं ?

बा०:--मला तो दिसलाच नाय.

मा०:--बाजा, हरामखोरा, तूं जर त्याला पाहिलं नव्हतंस तर वर्णन कसं केलंस त्याचं ?

बा०:––मी त्येला पाहिलं नाय तरी वर्णन बरोबर केलं. आन् तुम्ही त्येला पघुनशानी उलटं वर्णन करतां त्याच. तें कसं?

मा०:––मी तरी त्याला कुठं पाहिला आहे? वरून वर्णन आलं त्या अंदाजी सांगत होतों.

बा०:––मी पन तसंच सांगत व्हतो.

मा०:––बाजा, डांबिसा, माने फौजदाराची चेष्टा करतोस? अडली, फरारीकरतां आणलेल्या बिड्या काढ.

( बाज्या खिशांतून तुटलेल्या बिड्या काढतो व फौजदाराला देतो. )

बा०:––माज्याजवळ हायती.

मा०:––अरे बिड्या नाहींत. कडीतोडे, बेड्या.

बा०:––या बवा. बेड्या हायती का नांगराचे वसू?

मा०:––ऑं! फरारीच्या हातांतील तुटलेल्या बेड्या! तुला कुठं सांपडल्या?

बा०:––मला नाहीं सांपडल्या. गुंडास्नी सांपडल्या. ( थरथर कांपतो. )

मा०:––गुंडा! कोण आहे गुंडा? कुठं सापडल्या ह्या? जलदी बोला. मी माने फौजदार आहे. माझा बाप जमादार होता, आजा हावलदार न् पणजा शिपाई!

गुं०:––आन् खापरपंजा?

मा०:––तूं रे कोण हरामखोरा?

गुं०:––मी? गुंडा नाय का आपला!

मा०:––कुठं सांपडल्या ह्या? जलदी सांग. ( ठोकर मारतो. )

गुं०:––चंदरडोह्यावर.

मा०:––कशा सांपडल्या? केव्हां सांपडल्या?

गुं०:––काल रातीच मी गळ लावले व्हते डव्हांत. ते पघाया गेलो झुंझरुक. तवा बाबांनीं मघा सांगितला ना तसा एक मानूस मला दिसला थतं. हातातलं कडीतोडं कानशीत व्हता तो. मी दडलो मळीतल्या शेवरींत.

आन् थतून पगाया लागलं. त्या बाबानं कडी कानसून काढली न् थतंच टाकली. मागुनशानी कापडं उतरली. लंगोटबंद गडी व्हता तो. मी तर त्येच्या तयारीकड पघतच राहिलो. वाटलं घ्यावा उचलूनश्येनी खांद्यावर आन् न्यावा गांवांतून कुस्ती मारली कीं जय करीत मिरवीत बाजा लावून.

मा०:—( उतावीळ होऊन ) पुढं काय झालं तें तर सांग आधीं.

गुं०:—त्यानं ढवांत धोःकर उडी घातली.

मा०:—बरं बरं, पुढं ?

गुं०:—माझ्या डोस्क्याच्या वर पानी उडलं. अशी गंमत झाली. काय इचारूं नका. ( हंसतो )

मा०:—अरे, त्याच्यापुढं काय झालं तें सांग ना आधीं ! बाकीचं राहूं दे.

गुं०:—काय हकीकती झाल्या न् काय झाल्या नाहींत. काय गंमती झाल्यान् काय झाल्या नाहींत. अगदीं इचारूं नगा. चांगला घटिकभर गंमत पघत बसलो.

रा. ब०:—अरे हो. तीच गंमत काय झाली तें फौजदारसाहेब विचारीत आहेत तुला.

गुं०:—व्हय ना. मी पन त्येच सांगत हाय. त्या बाबानं धोःकर उडी मारली. पुरुसभर पानी उडालं. नाय का ! तुमीच सांगा. मागुनश्यानी घटिकभर लाटा उठल्या. त्येच्या मागुन घटिकभर उबळ उठले. आन् त्येच्या मागुन घटिकभर गाळ उमदळला. आन् त्येच्या मागून चिखूल वर आला. अगदीं क़ाळाकाळा ढोण. काय सांगूं ! अगदीं शाईसारखा काळा. न् मागुनशी बुडबुडे आले. न् त्येच्या मागुन.........

मा०:—एकदम सांग. ( ओरडतात. )

गुं०:—एकदम गप्प.......चिपचाप.......अशी गंमत झाली. लई गंमत. काय इचारूं नगा.

मा०: —( ओरडून ) पण तो फरारी कुठं गेला ?

गुं०:—तो कुठं गेला त्येचा पत्ता लागला नाय. मी मातुर इळभर ती गंमत पघत बसलों.

रा. ब०:—त्यानं जीव दिला ही गंमत होय !

बा०:—त्येनं जीव दिला ! मला तर थंड भरून आली. ( बाजा हिबानं थाडथाड उडूं लागतो. )

मा०:—गुंडा, तुझी हकीकत खोटी ठरली तर गुंड कायद्याखालीं अटक करीन तुला. ( जिरग्या येतो. ) कोणरे तूं ?

जि०:—जिरग्या. साहेब, चंदर डोहांतून ही कांबरुणं मला वाहत जातांना दिसलीं. मी कोळ्याकडून ती काढलिया. पघुन घ्या. ( माने हंसतात. )

मा०:—गुंडा, तुझी हकीकत खरी ठरते. हे फरारीचेच कपडे आहेत. चला चंदर डोहावर जाऊं या. गुंडा, वाट दाखीव. बाजा, तूं पण चल.

बा०:—नग. नग. थंड भरून आलिया मस्नी. इथंच लवंडतो वाईच. तुम्ही जा. गुंडा हाय संगती. त्येनंच पाह्यलाय फरारी. तोच सांगल संमदं. मातुर इनाम द्या हो त्येला. पाहिजे तर निम्मं तुम्ही घ्या.

मा०:—छट्. तूं फरारी शोधून देणार न् मी कां म्हणून निम्मं बक्षिस घेऊं ? सबंधच्या सबंध तुला मिळेल.

रा. ब०:—शिवाय मी आपले पांचशें रुपये देईन स्वतंत्र.

बा०:—द्या. द्या. मी घेईन. पैशाची लई जरूरी हाय मला. ( घोंगडं घेऊन पडतो. सर्वजण निघून जातात. पुन्हां चाहूल घेऊन उठतो. ओचे-पदर सावरून यल्ली कुठं तरी जायाला निघालेली असते. )

बा०:—कोन ? यल्ली. कुठं चाललीस ? फीर माघारी. फिरतेस का नाय ? ( यल्ली थरथर कांपत उभी राहते. )

बा०:—कुठं चालली व्हतीस बोल ?

य०:—कुठं नाय.

बा०:—पाव्हन्यास्नी वाढायाचं टाकून कुठं चालली व्हती भवानी ?

य०:—पाव्हन्यास्नी संमदं वाढलं कीं !

बा०:—अस्सं ! मी रामोशी हाय. असलं संमदं कावं जानतो मी. टक्कुरं फोडीन. खरं बोल. फौजदाराकडं बातमी देयाला चालली व्हतीस कीं नाय ?

य०:—व्हय. चुकी झाली माझी. पन कारभारी कतीक दिस हा वनवास काढायाचा ? आपनास्नी काय धा प्वारं हायती ? एक गुंडा. एकच फळ दिलंय देवानं. पैका नाय म्हून न्हायलं त्याचं लगीन.

बा०:—अस्सं. पुढं बोल. पुढं बोल.

य०:—ही सोन्याची संधि हाय. गुंडाचं लगीन लावूं. मला दागिनं व्हतील. तुमालाबी नवी कापडं, जरीची उपरणी, मुंडाशी व्हतील. कुठंबी वावरं विकत घेऊं न मजेशीर राहूं.

बा०:—झालं ? संपलं ?

य०:—व्हय. व्हय.

बा०:—आन रामोशाचा सबुद ?

य०:—तो गेला चुलींत. येवढं मोठं बामन लोक, शेटसावकार, वकील संमदं सबुद फिरवत्यात. न् आपुन कोन झाडाचा पाला. आपुन काय राम-हरिचंदर लागून राहिलोय ? तवा कारभारी, येळ घालवूं नगा. म्हंगाल तर मी मागं राहते. तुम्ही जा न् काम करा. मी त्येला अक्षि गुंगत ठेवते.

बा०:—जय मल्हारि मार्तंड. माझा सबुद म्हंजी सबुद. पैशावर मी थुकतो. पानतमाखु खावून पिचकारी टाकतो. रामोशी थुकलेलं चाटायचा नाय कंधीं. पांच हजार माझ्या थुकींत हायती. आन् त्ये चाटाया तूं चाललीस ? अवदसं, जा आतां घरांत. नाय तर करपवीन तुझी पाठ हथंच. ( यल्ली मागील दारानं घरांत जाते. पुढून धोतराच्या सोग्याला हाततोंड पुशीत विश्वास बाहेर येतो. )

बा०:—अर्ज्या, आतां मातुर दिसतुस रामोशावानी. चांगला रंगवलाय गुंडानं तुला. पोटपुजा झाली कां नाय निवांत ?

वि०:—अगदीं निवांत. यल्लीआईचं कोडयांस असं झकास झालं व्हतं कीं तुझ्यान् गुंडाच्या भाकऱ्याबी खाऊनशानी टाकल्या.

बा०:—बेस. बेस. बोलतोसबी बेस रामोशावानी.

वि०:—आतां तरी इथं बिनधास्त राहायाला हरकत नाहीं ना ? पण तुझं मोहोळ कुठं गेलं ?

बा०:—तें तकडं लांब गेलं. मल्हारिमार्तंडा, आतां ह्या गुंडा त्यांचं काय हाल करील कुनास ठाव. काटवनांतून, चिखलांतून, खाचखळग्यांतून, त्यांची वरातर नेईल. मल्हारिमार्तंडाची विच्छा. आपुन काय करनार. जयमल्हार.

वि०:—आतां पुढला बेत ? ( बाजानं दिलेली सुपारी कातरतो. )

बा०:—इसूबाळ, माजलेल्या टोनग्यांच्या टकरा शिंगानं बद्धन सोडवनाऱ्या बळिपाटलाश्वी हिंमत, ताकद म्या पाहिली हाय. मी पन कर्तुक केलंय आपल्यापरीनं. पन तुझी गोस्ट न्यारीच हाय.

वि०:—( कातरलेली सुपारी बाज्याला देत ) ती कशी ?

बा०:—( सुपारी तोंडांत टाकीत व बटवा सोडून विश्वासला पान देत ) मघापुन पाहतोय, अगदीं बेडर हाय तुझा चेहरा. काळे कुत्ते पकडतील, सजा देतील, हाल हाल करतील, फाशी देतील, कायबी नाय तुला त्येचं. आरं भाहिर यम उभे व्हते बकासुरावानी आन् आंत तूं रगडीत व्हतास भाकऱ्या भीमावानी. आन् आतां भाहिर येऊन पानपट्टी खात बसलास नवरदेवावानी. तेवढं मुंडासं घातलंस डोईला कीं कुनीबी रामोशी येईल आन् नेईल वाजत गाजत घरजावई करायाला.

( मागल्या कुंपणावर यल्ली दगडी मारते व ओरडते. )

य०:—हाड्या. हाड्या. हाड्या.

बा०:—कुनी आलं वाटतं नदींतून ? ( वळून त्या बाजूला प्राहतो. विश्वास त्याचं अनुकरण करतो. )

एक आवाजः—अरे धोंडे कां मारतां ? लागतील ना ?

य०:—पन ह्राय कोन तकडं ?

आवाजः—माणूस.

य०:—तें कळलं. समदीच मानसं असतात. चोरबी मानसंच असतात. आमची वावरं म्हंजी काय राजरस्ता समजतां ! ह्रकडून यायचं कारनच काय मुदली ? खुड, खूड, खूड. या कोंबडीनं काय तराश मांडलुया. (धोंडे मारते.)

आवाजः—यल्ले. यल्ले. मी आहे. धोंडे कां मारतेस ?

य०:—तुमी ह्रायती व लुलुबाई ?

ली०:—( पुढं येऊन ) दर खेपेला धोंडे मारायचे न मागून म्हणायचं तुमी ह्रायती वं लुलुबाई. ( एक तरुण बॅग हातांत घेऊन पुढ येतो. ) शरद् ! तूं कुठं इकडं ? अगदीं जमिनींतून निघालास भूमिगताप्रमाणं !

( शरद् खिशांतील आरसा काढून तोंड बघतो. केस विंचरतो. )

श०:—आन् पाट्यांची मोट काखोटीला घेऊन तूं कुठं चाललीस ?

ली०:—मी पलीकडच्या महारवड्यांत साक्षरताप्रसाराचं काम करत्यें. कुणी फरारी इकडं आलाय त्याला पोलीस शोधीत आहेत. बाबा पण फौजदारांच्या बरोबर आले आहेत असं मला कळलं. म्हणून ती गंमत पाहायला मी इकडं निघून आल्यें.

( शरद् कपाळाला हात लावतो न् डोकं हलवतो. )

ली०:—काय झालं ?

श०:—घात झाला. इकडच्या पोलिसांना येवढ्या लवकर माझी बातमी कळली कशी ?

ली०:—म्हणजे ! ज्याची तार आली तो फरारी न् तूं एकच ?

श०:—यांत काय संशय ?

ली०:—आगंबाई,आतां कसं करायचं ? शरद्, तूं आल्या पावलीं परत जा आपला.

श०:—लीला, तूं देशसेविका नं ? अन् पोलिसांना घाबरतेस ? काढून टाक तो बॅज. बदल साडीचा रंग.

ली०:--जीवनांतलं नाविन्य म्हणून मी देशसेविका झाल्यें. पण त्याचा परिणाम इतका भयंकर होईल अशी माझी कल्पना नव्हती. शरद्, बाबांनीं तीन रुपयांना एक रेक्रूट याप्रमाणं लाख रेक्रूट पुरविण्याचं कंत्राट घेतलं आहे. तें आमचं कंत्राट बुडेल ना तुझ्यामुळं ?

श०:--लज्जालालस लीले, तुला देशापेक्षां पैसा प्यार आहे ?

ली०:--काँग्रेसचे सगळे कार्यक्रम पैशाच्या जोरावर चालले आहेत. आमच्याजवळ पैसा जमला नाहीं तर आम्हीं काँग्रेसला कोठून देणार न् काँग्रेस जवळ पैसा आला नाहीं तर तिचे कार्यक्रम कसे सुरळीत पार पडणार ?

श०:--लीले, तूं मला हतबुद्ध केलं आहेस. कमाल आहे तुझ्या तर्क-शास्त्राची.

ली०:--शरद्, तूं असं केलंस तरी काय पोलिस तुझ्या मागं लागायला ?

( शरद् यह्लीकडं न् इकडंतिकडं संशयानं पाहतो. )

ली०:--माझ्या खंडकऱ्याची बायको आहे ! माझ्या विश्वासांतली !

श०:--लीलावति, मी स्फोटक क्रांतिकारक म्हणून पोलिसांच्या ब्लॅक लिस्टांत माझं नांव आहे हें तुला माहितच आहे !

ली०:--मला नाय माहीत.

श०:--गांधीजींच्या व्यक्तिमत्वाला भुलून आम्हीं काँग्रेसशीं सहकार केला. तरी मी आमच्या सभांतून वेळोवेळीं ओरडून सांगितलं आहे कीं, " रणावीण स्वातंत्र्य कोणा मिळालें ? " गांधीजींची सभ्यता, सहिष्णुता, दया, शांति, सत्यन् अहिंसान् वैष्णवधर्म यांना भुलून का इंग्रज हिंदुस्थानां-तून " चले जाव " करणार ? त्यांना लाथा मारून हाकलल्याशिवाय ते जाणार नाहींत. स्स. स्स. ( टाळी वाजवतो. ) कोण बसलं आहे तिकडं ? इकडं या. म्हणजे तुम्हालाहि ऐकायाला मिळेल न् माझा पण प्रचार होईल. ( विश्वास व बाजा जवळ येतात. ) आतां हा अपमान आम्हांला सहन होत नाहीं ! "ब्रिटिश हत्ती चलता है काँग्रेस कुत्तेकूं भुंकना देव." हें लॉर्ड लिनलिथगोचं वाक्य आमच्या हृदयांत तीरासारखं घुसून बसलं आहे.

आतां त्याला आम्हीं बेचाळीसच्या क्रांतीनं उत्तर देत आहोंत. एका मागून एक अशीं उत्तरें मी तयार करणार.

बा०:—आन् ?

श०:—आन् मी ठो करणार. चाफेकर बंधूप्रमाणं ठो करणार. खुदीराम बोस, मदनलाल धिंग्रा, अनंता कान्हेरेप्रमाणं मी ठो करणार.

ली०:—शरद्, शरद्.

श०:—आतां नाय ऐकणार मी तुझं. लीलान्वये, मीं पहिला बॉंब तयार केला.

बा०:—जय मल्हार.

श०:—पण तो खोटा निघाला. हातांतच फुटला.

ली. बा. य०:—( एकदम ) फुस्स.

श०:—दोन महिने हांथरुणावर पडून राहिलों जखमांमुळं. पण डरलों नाहीं. पहिल्याहून तेजस्वी दुसरा बॉंब तयार केला. पण भुलेश्वरांतून नेत असतां आपोआप उडाला. तीन गुजराथी जागच्या जागीं ठार झाले.

बा०:—आपलीच मानसं मारली ?

श०:—ये मुंडाशा, मधीं बोलूं नकोस. लीले, तुला वाटेल मी थाप मारीत आहें. पण तूं ही बातमी वर्तमानपत्रांत वाचली असशीलच.

ली०:—वाचली आहे. पण तो तूंच कशावरून ?

श०:—कळेल. कळेल. लीले, लीले, ( टिऱ्या पिटीत लीलासमोर पाठ वांकवितो ) माझी पाठ थोपट.

ली०:—तूंच आपल्या टिऱ्या बडवीत आहेस मग मी पाठ कशी थोपटूं ?

श०:—लीले, लीले, मी तिसरा बॉंब तयार केला. दुसऱ्यापेक्षांहि भयंकर. त्या रामोशांकडं काय बघतेस ? इकडं बघ.

ली०:—पण कशाकरितां ?

श०:––ऐक. त्या दिवशीं गव्हर्नर पुण्याहून मुंबईला जाणार होता. मुंबऱ्याच्या टेकडीवर उभा राहून मी त्याच्यावर बॉंब टाकण्याचा बेत केला.

ली०:––अगबाई !

श०:––मी टॅक्सीनं मुंबईहून मुंब्र्याला आलों व टेंकडीजवळ उतरलों. नंतर टॅक्सीड्रायव्हरला टॅक्सी घेऊन स्टेशनच्या आवारांत जाऊन उभें राहण्यास सांगितलें. त्यानं विचारलं. कां ? मी म्हणालों थोड्या वेळानं हा डोंगर हादरणार आहे. खाडी उसळणार आहे. सगळ्या देशाला धक्का बसणार आहे. तो म्हणाला, धरणीकंप होणार आहे कीं काय ? मग मात्र मी गाढवपणा केला. माझ्या डोळ्यावर क्रांतीचा खून चढला. मी बोलून गेलों. इथं बॉंब पडणार आहे.

ली०:––मग ड्रायव्हरनं काय केलं ?

श०:––त्यानं हंसत हंसत टॅक्सी गर्कन् मुंबईच्या बाजूला वळवली व जोरांत सोडली. क्षणांत तो नाहींसा झाला. मग माझ्या डोक्यांत प्रकाश पडला कीं ठाण्याच्या पोलिस स्टेशनावर तो बातमी द्यायला चालला आहे.

ली०:––( हंसत ) ठीक. मग तूं काय केलंस ?

श०:—मी ! समोर बॉंबे–पूना पॅसेंजर प्लॅटफॉर्मवर पुण्याकरितां उभी होती. मी त्यांत जाऊन बसलों गुपचूप न दिलान् पोलिसांना गुंगारा नि इथं आलों.

बा०:—भाद्दूर गडी हायती. पण त्या बामगोळ्याचं काय झालं ?

श०:—तो या बॅगमध्यें आहे माझ्या.

ली०:—अग बाई, बघूं ? बघूं. ( बॅग हिसकूं लागते. )

श०:—लीले, लीलटले. डेंजर ! फट्दिशीं उडेल. तूं, मी, हे लोक, हें झोपडं उडून जाईल. ( बाजा, यल्ली लांब पळतात. ) थांब. मी तुला दुरून दाखवितों. ( बॅग उघडून तिरंगी निशाणांत गुंडाळलेला सिगारेटचा टिन काढतो. अर्ध्या निशाण उचलून डोक्यास लावतो. )

ली०:—उंः, हा तर सिगारेटचा डबा आहे. ( सगळे जवळ येतात. )

श०:—कोण नाय म्हणतो. संशय येऊं नये म्हणून आम्ही रिकामे डबे कवच म्हणून वापरतों. परंतु याच्यांत अत्यंत ज्वालाग्राही व स्फोटक पदार्थ आहेत. इथं मी बी. एस्सी. झाल्याचं सार्थक झालं आहे. ( लीला टिन शरदच्या हातांतून हिसकावून घेते व कटर फिरवून डबा उघडते व त्यांतून ऑ वासून बसलेल्या शरदच्या तोंडांत सिगारेट देते. )

श०:—अरेच्या, खरा बॉंब घरींच राहिला न् चुकून टिन इथं आणला. बरं. पण चूक पथ्यावरच्च पडली. ( सिगारेट शिलगावतो व अज्यांपुढं सिगारेट धरतो. )

वि०:—मी नाय वढीत. ( बाज्यापुढं धरतो. )

बा०:—आपली खाकीच सोभते गरीबाला.

ली०:—बाजा, घे. आम्हाला मोकळा करून पाहिजे टिन बॉंब करायला. ( लीला बाजाला सिगारेट देते. )

श०:—तुमच्या या सदर्न मराठ्यांत अबदुल्ला कुठं पाहायला पण मिळत नाहीं. अग आईग. पाय नुसते आंबून गेले आहेत.

ली०:—दोन मैलांच्या रपेटीनं क्रांतिकारक थकतो ?

श०:—दोन मैलांची रपेट ! दहा मैल तरी चाललों असेन पाहटे-पासून. बरं रस्त्यांत कोणाला विचारावं तर तुमचे कृष्णाकाठचे लोक. गांज-ओढून डोळे लाल. जणुं कुणाचा तरी खून करायला निघाले आहेत. रस्त्यानं गाड्या भेटल्या. पण कानावरून ओढलेल्या मुडाशांतून त्यांना ऐकूं जाईल तेव्हां ना ? जणूं टोणगेच बैलगाड्या हांकीत आहेत.

बा०:—नदीवर नाय कुनी वाट दावली ?

श०:—नदीवर सगळेच फूं फूं करून जोर-बैठका मारण्यांत दंग. हांड्याच्या दुडी घेऊन जाणाऱ्या कांहीं किसान बालिका भेटल्या. पण त्या मस्तानयांना कोण विचारणार ? हांडेच बसले असते डोक्यांत. ( सर्वजण हंसतात. )

ली०:—तसाच आहे आमचा कृष्णाकांठ. बघा, ओंजळींत मोती

घेऊन शाळू कसा उभा राहिला आहे मस्त. आमचा शाळू मस्त, जनावरं मस्त. आन्...... ?

वि०:—मानसं बी मस्त.

ली०:—बाजा, कोणरे हा पाव्हणा ?

बा०:—अर्ज्या रामोशी. आमच्या गांवचा हाय तो.

ली०:—खरोखरच मस्त आहेत आमचीं माणसं. शरद्, बघ दंड, गर्दन न् पटा. बस्स. या अनाडी लोकांना साक्षर केलं तर भारतांत नवचैतन्य येईल. अर्ज्या, बाजा, यल्ली, शिकाल तुम्ही माझ्याजवळ ? (पाट्या, पेन्सिली त्यांना देते.)

श०:—या मिळमिळीत कार्यक्रमानं काय होणार ?

ली०:—अर्ज्या, अशी धर पेन्सिल. ह. काढ अ, आ, ई, ग (अर्ज्या पेन्सिल मोडतो. लीला दुसरी पेन्सिल देते.)

वि०:—लई हात जड माझा. (विश्वास ती पण मोडतो. लील तिसरी देते.)

श०:—त्या भले हत्तीला भाराभर पेन्सिली दिल्यास तरी तो त्यांची मोळी करून मोडील. त्याच्या डोक्याची कवचीच पहा किती जाड आहे. गिरमिटानं पण भोंक पडायचं नाहीं त्याला. मग तुझी साक्षरता त्याच्या डोक्यांत कुठून शिरणार ? नुसते बळकट स्नायू असून उपयोग नसतो. एखादा फाटका क्रांतिवीर यांच्याहून जास्त कामगिरी करील. यांना मर्द बनविलें पाहिजे. यांचा भेकडपणा घालवला पाहिजे.

बा०:—व्हय. व्हय. अवं गावरान बुजार पाखरं हीं. (एकदम ढोल वाजतो. शरद् दचकतो. पांढरा पडतो.)

श०:—लीले, ही काय भानगड आहे ? आवाज तर भयंकर आहे.

वि०:—बेरडांचा दरुडा येत हाय जनुं गांवावर.

श०:—दिवसाढवळ्या दरोडा ?

बा०:—हा किस्नाकाठ हाय. बेरडच ते. ते भितात कुनाच्या बाला?

श०:—लीले, तुझा बंगला इथून किती लांब आहे ?

बा०:—बसा वाइच. ( कांबळं हंथरतो. ) तो दरवडा इतच येईल. समदं दरोडखोर बळखीचं हायती माझ्या. ते काय बी करनार नाय.

श०:—दरोडेखोर नाचत दरोडा घालतात ?

ली०:—अहो मुंबईकर, ते खंडोबाचे वीर आहेत. देश म्हणजे काय तें माहीत नाहीं आन् चालले देशाचा उद्धार करायला ?

श०:—क्रांतिवीर ?

बा०:—नाय. देवाचे ईर. शरदराव, ध्यानामंदी ठेवा हा सबुद. 'ईर.' मानसानं उगाच वायफट बोलू नाय. तोंडांतून सबुद निघाला कीं, तो खरा करून दावला पाहिजे. नाय तर काय उपेग ?

ली०:—अहो क्रांतिवीर, ते देवाचे वीर आहेत.

श०:—लीले, नकोच. चल आपण जाऊं या. पण या इकडून कुठं निघालीस ? तो समोर दिसतोय तोच तुझा बंगला नं ?

ली०:—शरद्, आपण चंदर डोहावर निघालों आहोत. चल. ( लीला शरद्चा हात धरून ओढते. ) मी फरारी कधीं बघितला नाहीं. तिथं आपल्याला फरारी पाहायला मिळेल.

श०:—इकडं दरोडखोर न् तिकडं फरारी !

ली०:—भिऊं नकोस. पोलीसपार्टी गेली आहे तिकडं. ( ते दोघे जातात. वीर येतात. लेजिमांचा खेळ होतो. शरद्चं निशाण विश्वास वीराच्या काठीवर बांधतो. )

एकः—नग, नग. ही देवाची काठी हाय.

वि०:—आन् हें देवाचं निशाण हाय. चढवा. ( जबरदस्तीनं प्रतिकार करणाऱ्या लोकांना ढकलून निशाण लावतो. ) हें आमच निशाण हाय. आमच्या देशाचं हाय. हें फडकवून इंग्रजास्नी 'चले जाव' करन्याचा महात्मा गांधींनीं आम्हास्नी हुकूम केला हाय. याला पाहून आम्हास्नी निशा चढते. शुध राहात नाय. मी कॉंग्रेसचा शिपाई हाय. कांग्रेसच्या हुकुमापरमानं मी हे चढवनार. मला मना कोन करील !

एकः—पाव्हनं आम्ही आलोय देवाच्या कामास्नी. आम्हाला या सतरा-पंधरा गोष्टी कशाला होऱ्यात?

वि०ः—तुम्ही देशाची अब्रू घालवीत आहांत. महात्मा गांधीस्नी शरम आनीत आहांत.

वृद्धः—आम्हाला माहीत हाय कीं हें कांग्रेसचं निशाण हाय. गांवो-गांव हेंच चाललंय. पन हतं माने फौजदार आलाय. मोठा डांबिस हाय. त्यानं हे पत्रितलं तर पोलिस जमतील, आन् गोळीबार व्हईल, न् लोकांचे जीव जातील फुकाट. तवा तूं आपल्या वाटेनं जा. इंग्रजांम्होरं कांग्रेसचं कायबी चालनार नाय. माझ्या म्हाताऱ्याचा सबुद ऐक.

वि०ः—त्या इंग्रजांना आपुन हाकुन काढूं.

वृ०ः—तो इंग्रज कंधीं जायचा नाय. त्याच्या राज्यांत न्याव हाय. संमदी परजा खूष हाय त्याच्यावर. वाघन् शेळी एका झिऱ्यावर पानी पेतात त्याच्या राज्यांत. काशीपून रामेसरापोतर काठीला सोनं बांधून जावं त्याच्या राज्यांत. उद्या कांग्रेसचं राज्य झालं तर असा न्याव मिळेल आम्हाला? नाय मिळनार. हे बघा कांग्रेसवाले. बाजा, बघरे काय हाय त्यांच्या पिशवींत? ( महाशब्दे खादीची पिशवी घेऊन येतात. )

बा०ः—रामराम, सावकार. इकता उशीर केलात?

म०ः—जांबगांव बुद्रुकला फेअर प्राइस शाप काढलं आम्ही खटपट करून. लोकांची मोठी सोय झाली. काय करायचं! तुरुंगाच्या बाहेर राहून सरकारपुढं नाक घासावं लागतं आपल्या लोकांकरतां. ही देशसेवा फार वाईट आहे.

बा०ः—आन् पिशवींत काय आनलं? साखऱ्या हाय जनुं? मला तरी द्या छटाकभर. सबंध महिना साखरंवांचून काढला.

म०ः—अरे बाबा, जोंधळे आहेत यांत. पवाराच्या दिवसाला साखर मिळवली आमच्या फेअर प्राइस शाप नं. १ मधून लोकांच्या कार्डावर. तीन रुपये भाव दिला. तुला पाहिजे असली तर घरीं मिळेल त्या भावांत.

बा०:—अवं असं काय करतां ? गरीबाला पोतं झाडून द्या थोड्या भावांत.

म०:—बाजा, असं काय बोलतोस ! आज गरीब श्रीमंत एका लाय- नींत आणले आहेत इंग्रज सरकारनं. लोक ओरडतात आम्ही काळाबाजार करतों म्हणून. पण आम्हाला तुमच्याकरितां ओन द्यावं लागतं मूळ व्यापाऱ्याला. पुढं बुकिंग बंद म्हणून मोटारभाडं चढतं त्यावर. त्यानंतर वाटेतल्या पोलिस चौक्या न् सरकारी अंमलदार. सगळा चोरीचा धंदा झाला आहे. येवढं देऊन आमच्या पदरांत काय पडतं ? तुमच्या शिव्या.

बा०:—खरंच. खरंच. अगदीं खरंच.

म०:—सगळीकडं माल भरपूर आहे. पण अन्न, धान्य, कपडा, घासलेट, कोळसा यांकरितां तुम्हाला नाचवीत बसवायचा इंग्रजी कावा आहे हा. गेला का यांत तुमचा सगळा वेळ ! मग सरकारविरुद्ध तुम्ही चळवळ कुठून करणार ?

सर्व:—कुठून करनार !

म०:—रेशनिंगचा चाबटपणा व्यापाऱ्यांनाहि मारण्याकरितां आहे. कारण आम्ही कॉंग्रेसला पैशाची मदत केली. समजलात ? ब्रिटिश साम्राज्य- शाहीचा नाश झाल्याशिवाय आपले हाल संपायचे नाहींत. कॉंग्रेसचं राज्य झालं कीं बाजार खुला झालाच. कीं मग आम्ही व्यापारी लिहून देतों कीं आम्ही रुपायाला पांच शेर साखर देऊं.

बा०:—कॉंग्रेसच्या झेंड्याखालीं उभे राहून खरं बोलतां !

( महाशब्दे वर पाहतात. )

म०:—ऑं ! कॉंग्रेसचा झेंडा. स्तुत्य आहे तुमचा उपक्रम. मला आयतंच झेंडावंदनाचं पुण्य मिळत आहे. ( पायांतील वाहणा काढून डोळे मिटून हात जोडतात. ) जय हिंद. लोक हो, बोला महात्मा गांधी कीं (आवेशानं पिशवी वर करतात. पिशवीचा बंद तुटून खालीं पडते. त्यांतली साखर सांडते. )

लो०:—जय. ( गुंडा धांवत येतो. )

गुं०:—झेंडा काढायला माने फौजदार आला. पळा. पळा.

म०:—अरे बापरे ! ( पळून जातो. )

लो०:—अरे बापरे ! ( पळून जातात. )

बा०:—मुर्दाडांनो ! पळतां कां भागूबाईवानी ? फिरा मागं.

वि०:—थांबा. थांबा. माने कांहीं वाघ नाहीं. फिरा मागं. अरेरे काय ही या लोकांची दानत ! याच्च लोकांचे जीवावर आम्ही बंड करणार ! ह्याच्च आमच्या देशाचा गाभा ! बाजा, तूं झेंडा संभाळ. मी त्या भेकडांना समजावून आणतों. ( निघून जातो. )

बा०:—छटाकभर साखर विकत घेया राजी नव्हता तो घडाभर फुकट देऊन गेला. ह्यः ह्यः ह्यः गुंडा, चंगाळ झाली आपली. फौजदार यायच्या आंत साखर गुंडाळ आन् नेऊन ठेव घरांत. ( गुंडा साखर भरूं लागतो. )

बा०:—गुंडा, इत्ता येळ काय करीत व्हता ?

गुं०:—डव्ह तपासित व्हतो. भोई न् शिपाई दमलं तवा फौजदार आंत शिरला. बुड्या मार मारून समदं बहिरं झालं न् भसाभस शिंकत हैती.

बा०:—डव्हांत त्यांना काय सापडलं ?

गुं०:—एक मेलेलं गाढव. त्या गाढवानं त्याचाच पंचनामा केला. ( माने व इतर शिंकत येतात. )

मा०:—( झेंड्याकडं पहात ) ऑंछीः ( रुमालांत नाक शिंकरतो. ) काय भयंकर सर्दी ! अग आईग, पायांत काटे तरी किती प्रकारचे भरले आहेत. बाभुळ, सराटे, निवडुंग. हं. रावबहाद्दुर !

रा. ब०:—अग आईग ! माझा पण पाय मुरगळला आहे.

मा०:—बाजा, हरामखोरा, झेंडा कुणी लावला ? बोल लवकर. नाहीं तर ठोकरतों. [ मारायला धांवून जातो. ) ऑंः पाय उचलत नाहीं. ऑंछीः ( शिंकतो. )

बा०:—मानेसाहेब, त्या गांवचे लोक आले वाजतगाजत ढोल घेऊन. मी त्यांना मस्त सांगून पाहिलं पन ते मला जुमानत्याती ? मातुर तुमी येता म्हून जवा मी दम दिला तवा काय सांगू ? घोड्यावानी पळत सुटलं. अवं, ज्याचं कर्तुक त्याचा दरारा.

मा०:—ऑछी. अझून काय पाहिलं ह्राय त्यांनीं. पण तूं एखाद्याला तरी पकडून ठेवायाला पाहिजे होतं.

बा०:—अर्ज्याला मी पाठवलाय त्येंच्या मागं. एकाला तरी पकडल्या-शिवाय येनार नाय तो परत.

रा. ब०:—अर्ज्या ! कोण अर्ज्या ! नवीन माणूस आहे वाटतं ?

मा०:—फरारी तरं नाय ना ?

बा०:—अवं फरारी कुठला ! रामोशी ह्राय आमच्या गांवचा. असा जबान पोरगा ह्राय कीं पुसूं नका. गेले सालीं रावभाद्दुरांना दावला व्हता मळ्याच्या राखणीकरतां.

रा. ब०:—तो अर्ज्या हो ! भला दांडगेश्वर आहे तो.

बा०:—व्हय. व्हय. तोच. काय वाटेल ती कामगिरी सांगा त्येला.

रा. ब०:—मग रेक्रुटभरती करून टाकूं त्याची.

मा०:—नाहीं. नाहीं. आपण त्याचा फरारी पकडायाला उपयोग करूं. बाजा, जा. सोड त्याला फराऱ्याच्या मागावर, न् मिळीव सरकारी बक्षिस. ऑछी !! आंछूं ! ( बाजा व गुंडा निघून जातात. )

शि०:—ऑछीः

मा०:—सीज शिकिंग, ए काढ तें फडकं खालीं.

( पोलीस निशाण उतरवूं लागतो. मंजूळ येते. माने व रा. ब. तिच्या-कडं आधक नजरेनें पाहूं लागतात. )

रा. ब०:—कोण ग तूं ?

मं०:—महाराज, मी एक गरीब भिकारीण आहें.

रा. ब०:—मघाशीं गांधीवरचं पद म्हणत तूंच गेली होतीस ना आमच्या दारावरून ?

मा०:—रावबहाद्दूर, ही गांधी चळवळ सुरू झाल्यापासून या कोल्हाटणींनीं तुणतुणी टाकून एकताऱ्या उचलल्या आणि लावण्यांऐवजीं देशभक्तांचीं पदं सुरू केलीं.

मं०:—तुमचा तमाशा सुरू झाला म्हंजी तुणतुण्यावर लाबण्या बी म्हणूं; पन आतां देवाचीं दोन पदं तर ऐका.

रा. ब०:—चल, होऊन जाऊं दे.

मा०:—ए फटाकडे, मघांशी चावडीवर लावण्या म्हणून आमचा वेळ घेतलास, आम्हाला नादीं लावलंस न् इकडं फराऱ्यानं चंदरडोहांत जीव दिला.

मं०:—फरारी बुडून मेला ! ( मटकन खालीं बसते. )

मा०:—तो सांपडला नाहीं, त्याचं प्रेत सापडलं नाहीं. म्हणजे काय, तो मेलाच. पण काय ग, फरारी विश्वास पाटलाची न् तुझी ओळख कुठली ?

मं०:—त्याची माझी ओळख नाहीं. माझा जीवच हळवा आहे. म्हून मला असं झालं.

रा. ब०:—अस्सं होय ? आम्ही रात्रीं त्याची भरपाई करूं. रडूं नकोस. ( उपरणं घेऊन डोळे पुसायाला जातो. इतक्यांत पोस्टमन येतो व मान्यांना पत्रांचा भारा देतो. )

पो०:—फौजदारसाहेब, एक्स्प्रेस डिलिव्हरीचीं पत्रं आहेत. सबंध गांव धुंडाळाला पण सांपडला नाहींत. चालण्यानं दमून गेलोंय. कांहीं पोस्त मिळालं तर चहा तरी पिईन.

मा०:—अरे तूं स्वतः पोस्तमन असून पोस्त मागतोस !

पो०:—साहेब, मग सगळ्या पोलिसांना करा कीं पोस्तमन. ( जातो. माने टपाल फोडतात. )

मा०:—बापरे, तासगांवहून नवा फरारी पळाला. नेमका माझ्या हद्दींत.

विस्याहून दुसरा पळाला, नेमका माझे हद्दींत. पुणें, बेळगांव, धारवाड, नगर! नाशिकचे फरारी! अबब! किती झाले? सत्तावीस. आन् नेमके माझे हद्दींत! बेय्यांनीं दुसऱ्या तालुक्याचा भूगोलच पाठ केला नव्हता! खुणा तरी काय! चपटं नाक! तोंडावर देवीचे वण. छातीवर हिंदुस्थानच्या नकाशाची जन्म-खूण! वा रे फरारी! कर्म माझं! रावबहाद्दूर, ब्रिटिशांचा नाश होवो, साम्राज्यशाही, भांडवलशाही यांचा सत्यानाश होवो, पण आपल्याला नको ही कामगिरी. शिपाई, माझा पंचनामा कुठं आहे?

शिपाई:––कोणता? गाढवाचा?

मा०:––गाढवा, गाढवाचा नाहीं; माझा.

शि०:––तुमचा पंचनामा? हा घ्या. (माने पंचनामा फाडून टाकतो.)

मा०:––तपास बंद. (तारेचा शिपाई येतो व लखोटे देतो. माने लखोटे फोडतो) रावबहाद्दूर, आणखी पंचवीस फरारी माझ्या हद्दींत आले. एक पकडतांना मारामार! आतां पंचवीस न् सत्तावीस बावन्न वीर कसे पकडूं? बस्स. राजिनामा देतों.

रा. ब०:––मानेसाहेब, धीर सोडून कसं चालेल? आपल्या मदतीला मी आहें. अजून आपल्याला इन्स्पेक्टर व्हायचं आहे.

मा०:––ए कोल्हाटणी, हें निशाण घे तुला बक्षिस न् लाग पंढरपुरची वाट चालूं त्याला खांद्यावर घेऊन. नाहीं तर मी राजीनामा देतों. आपण दोघेहि फरारी होऊं. चला रे सर्व जण. (जाऊं लागतात.)

रा. ब०:––आन् तमाशा केव्हां करायाचा?

मा०:––कॉंग्रेस आमचा तमाशा करील तोच बघा कीं! चला.

[सर्व जण जातात.]

(मंजूळ निशाण आपल्या झोळींत टाकते व आंब्याच्या मुळांत रडत बसते. विश्वास व बाजा येतात. मंजूळ त्यांना पाहून हंसते.)

वि०:––काय करावं या आडमुठ्यांना! भेकड! शेळपट! यांच्या हातून काय होणार आहे! अंः (बुकी हातावर आपटतो.) हे सुधारणार तरी

कसे ? यांच्यांत शौर्य न् धाडस निर्माण तरी केव्हां होणार ? गांधीसारखे पुढारी मिळून सुद्धां यांचीं अंतःकरणं झंकारत नाहींत देशभक्तीनं !

बा०:—बेटे मागं वळून पाह्यायाबी थांबलं नाहींत !

मं०:—पाटील, चंदरडोह्यांतून वाचलांत ? बायकोचं कुंकु बळकट दिसतंय !

वि०:—तुझ्या पायां पडतों पण माझी ओळख देऊं नकोस. आज-पासून मी अर्ज्या रामोशी आहें.

मं०:—वारं माझा रामोशी !

वि०:—पण तूं कां परतलीस ?

मं०:—माझा सबुद खरा झाला कीं नाहीं हें बघायला.

वि०:—पन्नास टक्के खरा झाला तुझा सबुद. बाजानं मला आसरा दिला. पण एका भुरट्या फौजदाराच्या भीतीनं तुझे शेतकरी पळून गेले.

मं०:—तुम्हींच त्याला कारणी. तुम्हीच त्यांना भेकड बनवलेत. नुसते पुढारी शूर, ज्ञानी असून काय उपयोग ? सगळे लोक पुढाऱ्यासारखे बनले पाहिजेत. त्यांना चुचकारून चुचकारून त्यांचं हित कशांत आहे तें सांगितलं पाहिजे. म्हणजे आपल्या हिताचे रक्षणार्थ ते आपोआप शौर्य दाखवूं लागतील. त्यांनीं तरी प्राणावर उदार होऊन कशाकरतां तुमच्यामागं यायचं ?

वि०:—स्वातंत्र्य, स्वराज्य, ध्येय, मानवता, अहिंसावाद, गुलाम-गिरीचा–साम्राज्यशाहीचा द्वेष.

मं०:—बबब. त्यांना या शब्दांचा अर्थ सुद्धां कळणार नाहीं. त्यांचेच सबुद त्यांच्या डोक्यांत घातले तर त्यांना कांहीं कळेल. त्यांच्या लोकभाषेत त्यांना शिकवलं पाहिजे.

वि०:—त्यांचं डोकं फोडलं तरी कांहीं शिरणार नाहीं त्यांत.

( मंजूळ झोळींतून खंजिरी काढते. )

मं०:—जित !

वि०ः—जित.

मं०ः—तुझी माझी जीत एकदां घडल घडल घडल ॥ ध्रु० ॥

( गाणं ऐकून लोक जमूं लागतात. कडं करून भोंवती बसतात. डोलूं लागतात. दौलतजादा फेंकतात. मंजूळ त्याकडं ढुंकून पाहत नाहीं. )

होत्याचं कीं झालं नव्हतं ॥
नसत्याचं किंवा असतं ॥
आतां होईल भलतं सलतं ॥
उलथ्याचं तें पालथं पडल, पडल, पडल ॥ १ ॥
सोडुनियां न्याय नीत ॥
धरतां राक्षसांची रीत ॥
मसण आणतां गांवकींत ॥
आतां तुम्हां तुमचं भूत नडल, नडल, नडल ॥ २ ॥
मजूर आणिक शेतकरी ॥
जगवीती तुम्हां जरी
लेखितां कीं त्या भिकारी ॥
त्यांच्यावीण तुमचं परी अडल अडल अडल ॥ ३ ॥

शेतकरीः—वाहवाः ! खरं हाय.

कोण चालविलें नांगरफाळा ॥
कुऱ्हाड, कोयता, वा वीळा ॥
हातोडा कीं खीळामोळा ॥
मोहर जरी आला फळा खडल, खडल, खडल ॥ ४ ॥

शेतकरीः—बहार. कमाल झाली.

निशाण आमचं चढल, चढल ॥
गगनिं तारा अढळ जडल ॥
खालिं नौबत झडल झडल ॥
घुबड ढोलींमाधिं दडल, कढल, कढल, कढल ॥ ५ ॥

एकः—खूष केलंस आम्हास्नीं, पन दौलतजाद्याला तूं हातच लावीत नाहींस !

मं०:—याच्यापेक्षां मला जास्त मोलाची बिदागी पाहिजे.

दु०:—ही घे थैली. येवढंच हाय माझ्यापाशीं. एकदां गुन्हाळ सुरूं होऊं दे, म्हंजी नोटा ववाळून टाकीन तुझ्यावरून. ( मंजूळला पिशवी देतो. ती पिशवी फेकून देते. )

दु०:—हे बी नको तुला ! मग पाहिजे तरी काय ? तोंडानं सांग ना !

मं०:—तुमचं अंतःकरण. दिल्.

दु०:—बः बः ! ते आम्ही कवाबी द्येया तयार हावूंत.

मं०:—तुम्ही एकट्यानं देऊन काय उपयोग ?

लो०:—आम्ही समदं तयार हावूंत.

मं०:—मग मी भाऊबिजेच्या दिवशीं येईन तुम्हाला ववाळायला. तवा घाला तीं ववाळणींत द्या. ( सगळे जण चकित होतात. )

एक०:—आर् तुझ्या ! न्यारीच दिसतेय कोल्हाटीण. तूं व्हतीस तरी कंच्या तमाशांत ?

मं०:—नाना पाटलाच्या तमाशांत देशभक्तीच्या लावण्या म्हणत व्हतें मी.

दु०:—नाय पडत उमज. तूं म्हंगतेस घडल घडल घडल. हें काय घडनार हाय ?

मं०: —तें मी सांगत नाय. तें तुम्ही बघाल, डोळ्यानं बघाल. नाहीं तुम्हाला पाहावं लागल. पेराल तसं उगवल.

एक०:—आन निशाण कसलं ? ती काय भानगड हाय ?

मं०:—हें बघा, ज्याला भिवून पळालात तें. (निशाण झोळींतून काढते व दाखविते. ) भाऊबिजेला बहीण भावाला वाण देते ववाळल्यावर. तुम्ही थाला भ्यालात तर मी हें घालीन वाणांत. ( बांगड्या काढून दाखवते. )

एक०:—नग नग. ही कॉंग्रेसची भानगड नग काढूंस हयं. अवं

कॉंग्रेसचं राज्य आलं तर आपनार्स्नी भाकरतुकडा काय जास्त मिळेल ? आपुन गरीब असंच मरनार.

बा०:—भाकरतुकडा काय कुतरडी खातात.

एक०:—समदीच खातात भाकर-तुकडा. गरीब खातात जोंधळं बाजरीची चटणीसंगं. आन् शिरिमंत खातात गव्हाची तुपांत तळून शिरखंड बासुंदीसंगं. अवं या समद्या चळवळी न् भांडणं त्याच्याचकरतां हायती. तो गांधी टोपीवाला महासबुद. कॉंग्रेसच्या वरगण्या न् सभा करून शिरिमंत झाला. आन् त्या जोरावर दुकान थाटून आतां घालतोय खोबरेल तेलांत गोडं तेल. गोडं तेलांत घासलेट न् घासलेटांत पानी. काळाबाजार करून गब्बर झालाय. हाच न् उद्यां आमचा राजा व्हनार ?

मं०:—त्या गोऱ्या खाटकापरिस हे काळे खाटीक पत्करले. आपले तरी हायती. आन् जे इंग्रज सरकारच्या हत्तीची शिकार करनार त्यांना या घुंगुरट्यांचं भ्या वाटंल ? काळाबाजारांतलीं हीं माकडं मारायाला किती वेळ लागेल ? यांचा काळाबाजार एका दिवसांत हाकून काढूं.

बा०:—अरं बोला. असं गच कां बसलात ? तोंडातून सबुद कसा निघत नाय तुमच्या ? छाति काढून गर्दन फुगवून एक सबुद तरी बोला. बेचाळीस कुळ्या जमल्याती ऐकाया. बोला. मर्दांचा सवाल हाय हा. द्या सबूद. समदं एकदम.

( लोक गप्प बसतात. )

मं०:—सबुद ! सबुद ! केवढा मोठा सबुद ! बाकीचे लाख शब्द फुकट आहेत त्याच्यापुढ. या शब्दाइतका मोलाचा दुसरा कोणता शब्द सांपडेल कोषांत ?...आणि दुनियेंत पण ? केवढी ताकद आहे या शब्दांत आणि त्याचा रांगडा उच्चार करणाऱ्या बहुजन समाजांत ! बाजा, तूं मला कल्पना दिलीस. चाळिस कोटि लोकांचा एक सबुद झाला म्हणजे स्वातंत्र्य कसं मिळवायचं आणि मिळाल्यावर तें कसं टिकवायचं या प्रश्नाचा विचारच करावा लागणार नाहीं. बस्स. चाळीस कोटि लोकांचा एक सबुद... एक आवाज.

एक०:—पन इकल्या लोकांचा एक सबुद, एक आवाज कोन करील ?

बि०:—महात्मा गांधी. चाळीस कोटि लोकांचीं हृदयें खादीच्या सुतांत गुरफाटून महात्माजी चरक्याच्या सोहंमध्यें तो आवाज घुमवीत आहेत.

दु०:—हायिच तो तसा भाद्दूदुर. इंग्रज बनिये आन् तो पन बनिया. म्हून खादीच्या सुतांत तो त्यांची पुडी बांधील आन् त्याच सुतानं स्वर्गात जाईल.

पहिलाः—पन इंग्रज लई मगरे हायती. अद्याप कुनाला ते आटपले न्हाईंत. माझा बाप बाबाजी रामोशी, उमाजी रामोशाचा उजवा हात व्हता. आम्हीबी टोपीवाल्याशीं लढलो पन तो मागं हटला नाय.

मं०:—कारण त्यावेळीं सबंध देश उठला नव्हता. सर्व लोक बेफिकीर होते. म्हणून इंग्रजांनीं आमचेच लोक आमच्यावर सोडून आम्हाला मारून काढलं. तो काळ आतां बदलला आहे. महात्मा गांधींनीं इंग्रजांना 'चले जाव'चा हुकूम सोडला आहे. लोक " चले जावची " गर्जना करीत सरकारच्या मागं लागले आहेत. तुझ्या भाषेंत सांगायचं म्हणजे चाळीस कोटि लोकांचा एक सबुद...एक आवाज होत आहे. या शक्तीसमोर इंग्रजांचीच काय पण दुसरी कोणतीहि सत्ता टिकणार नाहीं. कारण ही सत्ता ईश्वरी आहे. जे करी प्रजा तें न करी राजा. आपण सगळ्यांनीं सबुद दिला तर या देशांत इंग्रजांना पाण्याचा एक थेंब मिळणार नाहीं. अन्नाच्या एका घासाला ते मोताद होतील; बोरायेवढं त्याचं गाठोडंहि कुणी उचलणार नाहीं. भुकेनें ते तडफडून मरतील. जीव नकोसा होऊन हिंदुस्थान सोडून पळतील. परंतु सर्वांनीं एक गोष्ट दिली पाहिजे. बाजा, कोणती ती गोष्ट ?

बा०—सबुद. दिला. माझा सबुद मी दिला.

गुं०:—मी पन माझा सबुद दिला.

लोकः—आम्ही पन आमचा सबुद दिला.

बा०:—मर्दाचा सबुद !

लोक:—मर्दाचा सबुद. फिरनार नाय तो.

गुं०:—जाऊं द्या झेंडा वर. ( झेंडा चढवतो. )

एक०:—आम्ही रामोशी पक्या दानतीचे न् सच्चा इमानाचे हावूत. आम्ही मेलों तरी आमचा सबुद फिरवनार नाय. पन आम्ही तुमास्नी सबुद कशासाठीं द्यायचा आन् तुम्ही म्होरं करनार तरी काय ?

मं०:—आम्ही लोकराज्य स्थापणार.

गुं०:—म्हंजी काय करनार ?

मं०:—लोकराज्य म्हणजे सगळ्या लोकांची मानवतेवर आधारलेली एक मोठी पंचाईत. या राज्यांत कोणी कोणाचा नाहीं होणार राजा कीं प्रजा. कायदा केला नाहीं तरी लोक स्वतः होऊन तो असल्याप्रमाणं पाळतील. आपण जगतील न् दुसऱ्याला जगवतील.

एक०:—पन शिरिमंत गरीबांना कसं जगूं देतील ?

मं०:—राज्यच मुळीं गरीबांचं होणार.

लोक:—खरंच ? असं कधीं व्हईल ?

वि०:—महात्मा गांधींचा सबुद आहे हा. खोटा होणार नाहीं तो. त्यानीं हा सबुद दिला म्हणून तर आम्ही त्यांना आमचा सबुद दिला. त्यांचा सबुद वाया जाणार नाहीं. चाळीस कोटि दरिद्री नारायणांचे देव आहेत ते.

बा०:—माझ्या संगं चाळीस रामोशी हायती जिवाला जीव देतील असे. अगदीं सबुदाचे धड. ते पन आपला सबुद देताल; मागं फिरनार नाय. पन बाकीचं लोक कसं टिकतील ? मानसाला दानत लागते. चोरांना बी दानत लागते. मग सावांना काय ? लागलीच पाहिजे. दानती बिगार काय बी व्हनार नाय. समदं फुकट जाईल.

वि०:—आपल्या उदाहरणानं सगळे आपल्यासारखे होतील. त्यांच्यांत दानत येईल. आपण सगळं घडवून आणूं.

मं०:—ध्यानांत ठेवा. कोणीहि कुठं फुटायचं नाहीं. कुणावर कुणी जुलुम करण्याचा, कोणावर कोणी राज्य करण्याचा कोणालाहि अधिकार देतां

येत नाहीं. मग ती परमेश्वराची आज्ञा असली तर चूक आहे. आपल्या लोकराज्याच्या विरुद्ध जो कोणी वर्तन करील तो आपला शत्रु. त्याला वाटेल त्या तऱ्हेनें वळणीवर आणणं आपलं काम आहे. खाष्ट मालकाला बट्या बैल देखील वळणीवर आणतो. मग तुम्ही तर माणसेंच आहांत. चला. आजपासून अन्याय सहन करूं नका. ध्यानांत ठेवा तुमचा सबुद. बोला महात्मा गांधी की जय. ( सर्व ओरडतात. निशाणाला नमस्कार करतात. ) आतां राम राम.

एक एक जणः—राम राम. माझा सबुद मी कधीं इसरनार नाय.

लोकः--माझाबी. माझाबी. माझाबी.

( लोक रामराम करीत निघून जातात. )

वि०:—मंजूळ, प्रथमच्च मी तुझ्या पायांवर डोकं ठेवलं तेंच खरं. तूं स्त्री असल्यामुळं आमच्या कामगिरींत अडथळा आणशील असं सांगून मी तुझा अपमान केला त्याची क्षमा कर न् आमची पुढारी हो !

बा०:—आन् माझ्या पडळींत राहा माझ्या लेकीवानी.

---

# अंक २ रा.

[ सीन तोच. संध्याकाळ होऊन गेली आहे. लांबून रडण्याचा व इवळ-ण्याचा आवाज ऐकूं येत आहे. ]

**बा०:**—आज रातभर शेकोटी कराया होवी वावरांत. थंडीचा कडका जानार आपल्या शिवारातनं. बरं का गुंडा, हिंवानं शाळू करपतो.

**गुं०:**—समद्या वावरावर धुराचं छत करून टाकतों. मग पघूं हिंव कसं पडतं तें ! ( पाचोळ्याचे ढीग ठिकठिकाणीं जमा करून ठेवतो. )

**बा०:**—( कान टवकारून ) मघापुन रडत कोन हाय नदीवरल्या चिंचाऱ्यांत ?

**गुं०:**—फौजदारानं गांव जमा केलाय कबुली जबाबाकरितां. आन् तो समद्यास्नी ठोकमार करीत हाय. बायकापोरांवर पन झोड उठवलीय त्येनं.

**बा०:**—मग होतय कुनी कबूल ?

**गुं०:**—कबूल व्हत्यात ! मंजूळच्यान् इस्वास पाटलाच्या एका सबुदावर एककटी गांव उठलाय, आन् समद्यांनी शपथा खाल्यात फुटायचं नाय म्हून. आन् समद्यांनी सबुद दिलाय जिवाला जीव द्यायचा म्हून. आतां कसं फुटतील ?

**बा०:**—वारं पठ्ठे ! आतां फौजदार काय करील ?

**एक०:**—( लंगडत येतो. ) आतां फौजदार बोंब मारील. हरामखोरानं माझ्या मांडीवर काठी ठेऊनशानी तिच्यावर दोन शिपाई उभे केले. पन तोंडातून सबुद नाय काढला मी. मी पन त्याला वाकवीन आन् लंगडायला लावीन. नाहीं तर नांव नाहीं सांगनार बाब्या कोळी. आजपासून नारूच्या डव्हांतील पानी भरीन त्याच्या मडक्यांत तरच बलुत्याला येईन खळ्यावर.

दु०:—मी पन खाशाबा परीट म्हून नांव सांगनार नाय. समदी कांब-रुणं जाळीन त्याचीं इस्त्री करतांना. तरच व्हईन नांवाचा. अरं, राजाचा तोंड पुसायचा रुमाल त्याची लंगोटी करतों आमी.

तिसरा:—तूं पहिलवान होऊन मार खाल्लास ?

खाशा:—आरं उगीच मासक्या हाकलल्या गालावरच्या. पन तुला उन्हांत उभं केलं दगड डोक्यावर देऊन तवा तूं काय केलंस ? मी घोंडीबा न्हाई लई हुशार म्हून गप्पा मारतोस खुटावर त्या फुकटच काय ?

धों०:—अरे नाऊ न् काऊ. फरारी कसा पकडायचा म्हून डोस्कं खाजवतो फौजदार सदा न् कदां. मी त्याची डोस्क खाजावण्याची चांगली सोय करून ठेवलीय.

सगळे जण:—ती रे कशी ? ती रे कशी ?

धों०:—खवड्याच्या वस्त्यानं रोज चालवलीय हजामत त्याची. आरं नाव्ह्याच्या हातांत राजाची शेंडी.

बा०:—आतां मल्हारिमार्तंडाचा धांवा करील तरच तो वांचल.

गुं०:—नाय देत कुनी त्याला चाला दूध कीं भाकरीचं पीठ. समदा गांवच मुदली पळून गेलाय रानांत.

बा०:—आतां वशाड गांवचा हा फौजदार चावडीवर बसून काय गळा काढील ?

( पडद्यांतून मान्याचा आवाज होतो. )

मा०:—( पडद्यांतून ) बाजा ऽ ! बाजा ऽ !

सर्व०:—आला जनुं ! ( निघून जातात. जातांना एकमेकांना खुणा करतात. )

मा०: —अरे माझा अडली कुठं गेला ! माझे कानस्टेबल मेले कीं त्यांनीं राजिनामे दिले ?

बा०:—साहेब, या बाजूनं या. पांधणीच्या अंगानं. हां हंगं. असं इकडून.

मा०:—आतां काय करावं ? अंधारांत वाट बिलकूल दिसत नाहीं.

बा०:—बिजली दावा.

मा०:—अरे काय डांबिस तुझा गांव. माझा टॉर्च पण चोरला कुणी ! मी या हद्दीचा फौजदार. आतां मी कोणापुढं चोरीची फिर्याद देऊं ? ( माने येतो. )

बा०:—फौजदारसाहेब, तुम्हाला नव्हतों मी सांगत कीं एकदां का लोक बिघडले कीं समदं बिघडलं. जे करी परजा ते न करी राजा. एकदां लोकगंगा फिरली कीं तिच्या म्होरं कुनाचं चालायचं नाय.

मा०:—बघा चार दिवसांत तुमचा गांव दुरुस्त करतों कीं नाहीं ? एकेकाला अटक करून तुरुंगाची हवा दाखवतों.

बा०:—अवं गांवच्या गांवं बिघडल्यात पिलिगाच्या साथीवानी. या समद्यांना तुरुंगांत घालनार ?

मा०:—बाजा, कांहीं तरी युक्ति काढ बुवा.

बा०:—काय काढूं युक्ति ? कर्म ! मी तुम्हाला मदत करतों म्हून रातच्या दगडी येतात माझ्या गोठ्यावर. अर्ज्या रामोशा हाय सोबतीला म्हून काय तरी निभाव हाय. नाय तर या गांववाल्यांनीं उठवून लावलं असतं गांवांतून.

मा०:—बाजा, नामुष्कीची गोष्ट होईल फरारी सांपडला नाहीं तर.

बा०:—तें काय नाय. सरणचिट्ठी द्या झालं. समदा लोकसागर खवळला. मग आपुन काय करनार त्याच्या म्होरं ?

मा०:—अरे शरण कसा जाऊं ? मला पोट आहे ना ! आन् पोरंबाळं !

बा०:—कोन जातो सांगायाला. महिन्याच्या महिन्याला पगार घ्यावा बेलाशिस्क न् द्यावा रपोट हकडं चळवळ भिळवळ काय बी नाय म्हून. लोकांनीं फराऱ्यावर पाखार घातली कीं तो सांपडंल ! भुशाच्या ढिगांत सुई पडली कीं ती सांपडंल ?

मा०:—हटायचं काम नाहीं होणार माझ्याकडून. मी माने फौजदार

आर्हे नांवाचा. ब्रिटिश सरकार अझून मेलं नाहीं. आपण बराबर सूड घेऊं डोकं चालवून. ( डोकं खाजवतो. )

बा०:—हां, डोस्कं खाजवून कांहीं तरी शकल काढाच. म्हंजी बार उडवण्याचं काम माझं.

मा०:—अरे बाबा, खवडे पडल्यामुळं दुहेरी डोकं खाजवावं लागतं तरी कांहीं सुचत नाहीं. जन्मांत एक घामोळं उठलं नव्हतं माझ्या अंगावर; पण इथं आल्यापासून खवड्यांनीं डोकं भरलं नुसतं.

बा०:—गांवच्या म्हसोबाला नारळ कबूल करा. लई द्वाड हाय तें दैवत. बाहेरच्या मानसाला टिकूं देत नाहीं हथं बिलकूल. त्याला नवस करा कीं पुढल्या आवसंच्या आंत तुझी शीव सोडीन म्हून.

मा०:—बाजा, पटली तुझी गोष्ट. वीस वर्षे फौजदारी खात्यांत काढलीं मीं. माझा बाप, आजा, पणजा याच खात्यांत वाढले. पण असा प्रसंग नव्हता आला आमच्यावर. अस्सं दमवलंय या भूमिगतांनीं कीं पाय टाकवत नाहीं पुढं. बाभुळ बनांत बांधलेला माझा घोडा पण उधळून लावला कुणी. उद्यां अगोदर तो शोधून काढला पाहिजे. बाजा, आज नाहीं जात गांवांत. इथंच मुक्काम करतों. ( खाटेवर बसतो. )

बा०:—वः वः राहा कीं. घर तुमचं हाय.

मा०:—मघांपासून खाज कसली सुटली आहे कपड्याच्या आंतून ? कोटाच्या आतून टोंचत आहे.

बा०:—असतील ढेकणं नाय तर पिसा.

मा०:—छेः छेः ! कुयरीचीं नाहींतर निवडुंगाच्या बोंडाचीं कुसं आहेत खास. त्या शाळेंतलीं कार्टीं शिरलीं होतीं चावडींत दुपारचीं. त्यांचाच हा वात्रटपणा आहे. झटक पाहूं हा कोट. ( बाजा झटकतो. )

मा०:—( बुटाच्या लेसी सोडीत ) काय रे बाजा, ती त्या दिवसाची कोल्हाटीण तुझ्याच पडळीवर आहे वस्तीला ?

बा०:—व्हय ना. दिवसाची गावांत चार घरं मागते न् येते रातची बिचारी हथं झोपाया.

मा०:--तिचा गळा म्हणे सुंदर आहे. बोलाव जरा तिला.

बा०:--साहेब, बूट नगा काढूं. तसंच राहूं द्या.

मा०:--बूट ठेवून झोपूं ? तें कां ?

बा०:--पडळींत उंदरांचा लई तरास हाय. फुकून फुकून पाय खात्यात. रातभर आम्ही जागे राहतों.

मा०:--मग मी इथंच निजेन बाहेर खाटेवर.

बा०:--थंडीच्या कडक्यांत झोंपनार ? आतांच हिंव भरलंय. इथं कसं झोंपाल ? आमच्याजवळ नाहींत हातरुणं की पांघरुणं.

मा०:--नसूं दे. पण जरा त्या कोल्हाटणीला पाठवून दे इकडं.

बा०:--ती आली नाय अजून. आली म्हंजी हात धरून उठवा, आन् लावा म्हणाया लावण्या. अवं या कोल्हाटणी म्हंजी चवल्या पावल्यांच्या धनणी; पन फौजदारसाब, आमच्या गांवचा तो अर्ज्या रामोशी आलाय ना, तो तिच्यावर डोळा ठेऊन हाय. तो अर्ज्या हाय जरा हिरवट.

मा०:--बरं सांगून ठेवलंस. तो नसतांना तिला पाठवून दे म्हणजे झालं. उगाच त्या रानवटाच्या वाटेस जा कशाला ? बरं, आतां थोडी पोट-पुजा करावी न् मग झोंपावं.

बा०:--मी तरी त्येंच म्हंगतों. समद्या जगाची आपुन उठाठेव करतों, वपुजा करतों तें या दीडवीत पोटाकरतांच. करा. करा. वाईच पोटपुजा करा. पन आमची गरीबाची चटणी भाकर हं. (गुंडा परळांत भाकरी व पाण्याचं मडकं न् नरोटी आणून ठेवतों. माने त्याकडं तिरस्कारानं बघत राहतो. तुकडा उचलून खातो. त्याला चावत नाहीं.)

मा०:--असल्या भाकऱ्या खातां तुम्ही ? (बाजा काड काड चावून दाखवतो.)

बा०:--गरीबांचे हाल तुमास्नी काय माहीत ?

मा०:--मग जरा कणसं चोळ पाहूं ?

बा०:--अवं ही भाकर खातां येत नाय तर हुरडा कसा खाल? पार निबार झाल्याती दाणं. आनूं!

मा०:—बरं बाबा, एक पेलाभर चहा तरी ठेव.

गुं०:--हां. तें काम माझं. पन कोरा ध्येया व्होवा. घरांत दुधाचा थेंब न्हाय. आन साखरबी नाय. काळ्या गुळाचं पानी मिळेल. (पांघरुणं बाजेवर टाकतो. बिछाना करतो.)

बा०:--आन् फौजदाराच्या चाकरतां दूध आनलं ह्यो लोकास्नी कळलं कीं आमचीं संभर वर्स पुरी झालींच.

मा०:--बरं बाबा, थंडा फराळ करतों. (पाणी पितो. अंगावर पांघरुण ओढून निजण्याची तयारी करतो.) इश्श! किती घाणेरडी आहेत हीं! कैक वर्षांत यांनीं पाणी पाहिलं नसेल. गुंडा, उचल, उचल तीं. मी आपला तस्सा निजेन. नाहीं तर खंडीभर उवा चढतील माझ्या अंगावर. (गुंडा पांघरुणं उचलतो. माने तसाच निजतो.) हें बघ कोल्हाटीण आली म्हणजे उठीव मला. हं!

बा०:--त्येची नगं काळजी. गुंडा, चल पडळींत. आज थंडीचा लई कडाका हाय. (गुंडा, बाजा पडळात जातात. दगडीचा मारा सुरू होतो. माने उठतो व रिव्हाल्व्हर झाडतो. फाड्, फाड् आवाज होतात. बाजा, यल्ली, गुंडा पडळीची खिडकी उघडतात व तींतून बघतात. कांपतात. थाड् थाड् उडतात. भीतीनें हुः हुः हुः करतात.)

बा. गुं. य०:—(एकदम) हुः हुः हुः! फौजदारसाहेब नगं नगं. हुः हुः हुः! जमाव मोठा हाय. हुः हुः हुः! बय. बय. बय.आय. आय. आय.! (चहूकडून निरनिराळे आवाज सुरू होतात. भुतं इवळतात. घुबडं घुकारतात. कोल्हे हुकतात. सायाळी गपतात.)

आवाजः--गोळ्या संपल्या! हाः हाः हाः! हुः हुः हुः! गोळ्या संपल्या. हाः हाः हाः! हुः हुः हुः!

मा०:--(घाबरून) बाजा, बाजा, धांव मला वांचीव. माझ्या गोळ्या संपल्या. मी इथं राहात नाहीं. मला गांवांत पोंहचीव.

बा०:—गोळ्या संपल्या तर सरकार तुमास्नी पुन्हा देईल. पन् आमचा जीव गेला तर आमास्नी कोन परत देईल ? माझा सबुद ऐका. या लोकांचा नाद सोडा. धा म्होरं आपलं काय चालतं ? यांच्या म्होरं यायची आमची छाती नाय. हुः हुः हुः !

मा०:—बाजा, बाजा, मी तुझ्या पायां पडतों. तूं बाहेर ये.

गुं०:—बाबा, नगा, नगा ! हुः हुः हुः !

य०:—कारबारी ऽ ऽ ऽ हुः हुः हुः ! गळ्याची शपथ हाय बाहिर जाल तर. अगं बाईग. ( धोंडे जोर करतात. माने खाटेखालीं जातो. )

मा०:—बाजा, तूं मला बापाच्या ठिकाणीं आहेस. मला घरांत घे.

बा०:—आई, आई, हुः हुः हुः ! बय. बय. बय ! ! पन दार कसं उघडूं ? हातापायांची मोट झालीया.

वि०:—( आवाज देतो. ) कोन हाय थकडं ? मला नाय चालनार असला चावनटपना. या अर्ज्याशीं गाठ हाय. ह्यो घ्या तुमच्चंच धोंडं ( गोंफण गुंडा चालवतो. लोक कापतात. " अर्ज्या आला, अर्ज्या आला " करून ओरडत जातात. ) पन फौजदार कुठं हाय ? ( खाटेखालीं वाकून पाहतो. ) साबारी खिशामंदी ठेऊन या माकडांना भितां ? या भाहिर. मी हथं हाय. पघूं कोन हात लावतो तुमच्या अंगाला !

मा०:—( बाहेर येऊन विश्वासची पाठ थोपटतो ) बारे बहाद्दूर ! तूंच कां अर्ज्या रामोशी ? दहाला भारी आहेस खास. खरा रामोशी असा असतो. हा बाजा न् गुंडा फुकट आहेत. तूं माझा जीव वांचविलास. मी तुझा फायदा करून देईन. या विश्वास पाटलाला पकडून दे. आतांपर्यंत तो मेला म्हणून मी समजत होतों. पण या प्रकारावरून तो जिवंत आहे व लोकांना चिथावीत आहे हें नक्की ठरतं. मी तुला 'सरकारचं इनाम व वर जेजूरीच्या पठाराला जमीन मिळवून देईन. पोलिसांत एकदम हवालदार म्हणून भरती करीन. आणखी काय पाहिजे ? बोल.

वि०:—तें काम माझं. मी त्येला तुमच्या सामनी खडा केला असंच समजा.

मा०:--आन् मला चावडींपोतर सोबत कर.

वि०:--गुंडा, मला वाट नाय म्हाहित बराबर. तूं यांना आड रानानं वाटेला लाव. मी इकडून लोकांना गुंगवतों. ( बाजूला जातो. )

मा०:--( हळूच ) बाजा, कोल्हाटणीला धाडून दे चावडीवर. विसरूं नकोस हो. तिला सांग, फौजदारसाहेब तुला बक्षिस देणार आहेत.

गुं०:--चला चला वेगी. या इकडून. नाय तर बक्षिस मिळेल आपनास्नी.

( गुंडा, माने जातात. मंजुळ येते. )

वि०:--बाजा, काय चालवली आहे ही चेष्टा त्या फौजदाराची ?

बा०:--विंचवाला खेटरानं नाय मारायचा तर काय फुलांत नेऊन बसवायाचा व्हय ?

वि०:--छट्. ते हलकट झाले म्हणून आपण व्हायचं ?

बा०:--आपनास नाय बा तुमचा भलोवा पटायचा. आम्हीं त्याची अशी फजिती करून त्याला वटणीवर आनूं.

मं०:--अः ! चालायच्याच असल्या गोष्टी. ही लढाई आहे. लोकराज्यांत लोकरंजन नको का कांहीं ?

वि०:--चांगली आहे करमणूक. ( गुंडा येतो. )

गुं०:--कमाल केली या लोकांनीं. फौजदाराला मी गांवच्या वाटेला लावलं तवा लोकांनीं त्याच्यावर पिसाळलेला कोल्हा सोडला. बिचारा जीव घेऊन गावाकडं पळाला. ( सगळे हंसतात. )

वि०:--गुंडा, आज महाशब्दे येणार आहे वीरांच्या सभेला.

बा०:--कशाला बोलवतां त्यास्नी ? तो महासबुद नाय पोकळ सबुद हाय.

मं०:--पैशानं ज्यांचे डोळे फिरतात ते कधीं गरीबांचं राज्य करतील ? भ्रम आहे हा तुमचा.

वि०:—कॉंग्रेसश्रेष्ठींच्या आज्ञेप्रमाणें मी त्याला बोलवून तर चुकलों आहें. गुंडा तुला परवल माहित आहे ना ?

गुं०:—होय, सुभासचंदर.

वि०:—बराबर. त्या तिथं शाळूंत बस न् परवलावांचून कुणाला सोडूं नकोस. ( गुंडा जाऊन बसतो. )

एकवीरः—सुभाषचंद्र.

गुं०:—जा.

दु. वीरः —सुभाषचंद्र.

गुं०:—जा.

ति. वीरः —सुभाषचंद्र.

गुं०:—जा.

मं०:—चहा तयार आहे. मी घेऊन येतें. ( पडळींत जाते. )

वि०:—या, वीर. या. कडकडून भेटतो.

बा०:—या, वीर, या. (कडकडून भेटतो.) बसा. बसा. ( बाजा कांबळं हांतरतो. वीर त्यावर बसतात. ) पाय नुसतं दमून गेलं असतील, नाय ? ( बाजा एका वीराचे पाय चेपूं लागतो. )

वीरः—छेः छेः बाजा, तूं देवमाणूस आहेस. आमचं डोकंच फक्त तुझ्या पायाला स्पर्श करूं शकेल. (वीर बाजाच्या पाया पडूं लागतो. बाजा त्याला मना करतो. )

बा०:—ईर, नगा. नगा. ( बाजा पाय मागं घेतो. ) यल्ले, झगरं फुलव, आन् गुंडा, म्यां गोलाचीं कवळीं लुस कनसं कापून ठेवलींत चवाळ्यांत हुरड्याकरतां तीं घेऊनशानी ये. ( मंजूळ तपेलं न् वाट्या घेऊन येते. ) पोरी, तपेलंभर चानं काय व्हनार ? हंडाभर पाहिजे. चार मंडळी उजून जमनार हायीत. आपना जवळ मायंदळ दूध हाय आन् महासबूद साखर पन देऊनशान गेलाय. जा, आनखी आन. (गुंडा कणसांचं टोपलं आणतो.

यल्ली तीं भाजते. बाजा चोळतो. वीर हुरडा खातात. चहा पितात. मंजूळ आणखी एक तपेल चहा घेऊन येते. )

एक वीरः—वः ! बासुदीसारखा झकास झालाय चहा.

दु. वीरः—आन् हुरडा किती सुंदर लागतोय !

बा०:—घ्या. घ्या. आनखी घ्या. इक्तासा हुरडा नाय पुरनार दाताला कीं वठाला. मोठ्टालीं काम हातांत घेतल्याती त्यास्नी खांदा देयाचा म्हंजी देह मजबुत होया पाहिजे. खायाल तो वाहील. घ्या. खा.

वि०:—बाजा, तूं हें काय मांडलं आहेस ? यंदा तूं आपल्याला धान्य ठेवतोस कां हुरड्यावारी लुटावतोस ? माझ्या तालमींतलीं सगळीं पोरं दिवसभर चरत असतात तुझ्या बावरांत.

बा०:—चरूं द्यात. मला कायबी कमी पडनार नाय. मानसापरीस जगांत काय अधिक हाय ? सकस अन्न खाल्ल्या बिगर आमचं गडी कसं तयार व्हतील न् गनीमांबरोबर लढतील ? महासबुदाच्या दुकानांतलं घास्तेल पिवून ? खा. अनमान करूं नगा.

एक वीरः—लोकांचा उठाव कसा आहे इकडं ?

वि०:—भयंकर ! खेडोपाडीं आम्हीं कॉंग्रेसचं लोण पोंचविलं आहे.

मं०:—यांचा माझा यावरून रोज खटका उडतो. हे हुल्लडीचा पुरस्कार करतात. मी लोकशिक्षणाचा. कारण लोकशिक्षणाशिवाय लोक-राज्य नाहीं. आणि लोक शिक्षण लोकभाषेंत दिलं पाहिजे. तेंहि जीवना-तील सौंदर्यानं आकर्षित करून.

वीरः—भूमिगत असून तुम्ही शाळा पण चालवतां ?

मं०:—नाहीं. कारण नुसतं “ गनभ ” शिकवून कांहीं होणार नाहीं. शेतकरी शिक्षण विसरून जातात. त्यांच्यावर शिक्षणाची सक्ति करण्या-ऐवजीं त्यांना शिक्षणाची शक्ति दाखविली पाहिजे. लोकराज्य, स्वातंत्र्य म्हणजे काय व तें कशाकरतां मिळवावयाचें ही जाणीव त्यांच्या रोमरंध्रांत खिळविली पाहिजे. हिंदुस्थानांत शेतकरी हाच खरा राष्ट्रपुरुष आहे. त्याला त्याच्या सामर्थ्याचा आत्मप्रत्यय आला पाहिजे.

वीरः—त्याकरतां तुम्ही काय करतां ?

मं०:—आम्ही त्यांची आर्थिक स्थिति सुधारून एकीबर त्यांची शक्ति केंद्रित करतों. प्रचाराकरितां फड, तमाशा, हंगामा, बेंदूर, पोवाडे यांचा उपयोग करतों. गुंडांवर दरारा बसविण्याकारितां आम्ही कोर्ट स्थापन केलीं आहेत. त्यांत कधीं गोडानं, कधीं दहशत दाखवून, कधीं विनोद करून तंटे मिटवतों. आतांच तुम्हाला गंमत दिसेल. हा पाहा ठमाजी कांहीं भानगड घेऊन आलाच.

ठ०:—पाटील, घमाजी इमालानं माझी कोंबडी चोरली शेजारी असून.

घ०:—नाय. कोंबडी माझी हाय. म्यां रंग टाकलाय गुलाबी तिच्यावर.

ठ०:—म्या पन टाकलाय.

वकीलः—( भरभर शब्द उच्चारीत. ) साहेब, कोंबडी हा बर्डच असा आहे की त्याचं आयडेंटिफिकेशन होणं शक्य नाहीं. गुलाबी कोंबडी ठमाजीची की घमाजीची हा प्रश्न पुराव्याच्या कायद्याप्रमाणं सिद्धच होत नाहीं मुळीं.

वि०:—पंजाब मेल सोडणारे तुम्ही कोण ?

वकीलः—मी आरोपी घमाजीचा वकील, सर, वकिली म्हणजे शब्दांची सर्कस आलीच.

वि०:—शब्दांच्या सर्कशींत विदूषकाचं काम करण्याऐवजीं देशाची वकिली करा. निदान कोंबड्या तरी पाळा. म्हणजे देशाला अन्न मिळून वकिलीपेक्षां जास्त पैसा मिळेल. महाशय, खटले लढवून घरादारांचं वाटोळं करण्याचं कोर्ट नाहीं हें. हें लोकराज्याचं कोर्ट आहे. यांत वकिलाला काम नाहीं. गुंडा, कोंबडी इथं बांधून ठेव न् संध्याकाळीं या दोघांच्या घरांच्या मध्यावर सोड. ज्याच्या घरांत कोंबडी शिरेल त्याची कोंबडी व ज्याच्या घरांत शिरणार नाहीं त्याला पन्नास पत्र्यांची शिक्षा.

ठ०:—अर्ध रुपयाच्या कोंबडीकरतां शेजाऱ्याला मार बसवनार नाय

उमाजी. घम्या, जा घेऊन कोंबडी. कापुन खा नायतर अंड्यावर बसिव. काय बी कर तकडं. ( कोंबडी घम्याला देतो. )

सत्तूः—पाटील, या खाशानं माझ्या तोंडांत मारल्या !

खाशाः—तूं कां आधीं शा दिल्यास मला ?

वि०:—सत्तू, तूं कां नाहीं मारलंस खाशाला ?

स०:—खाशा पेलवान हाय. माझा मार तो खाईल व्हय !

वि०:—तूं कां नाहीं होत पहिलवान, मेहनत करून खुराक खाऊन ? राष्ट्राच्या फौजेकरितां आम्हाला खाशासारख्या जवानांची जरूरी आहे. सत्तू, कोण आहेत तुझे साक्षीदार ?

स०:—गण्यान् गंप्या.

वि०:—खाशा, सत्तूला मारल्याबद्दल तुला पांच रुपये दंड. सत्तू, मार खाल्ल्याबद्दल तुला पांच रुपये दंड. गण्या-गंप्या, शेतकीचीं कामं टाकून टवाळ-टोळांप्रमाणं कोर्ट हिंडण्याची हौस बाळगल्याबद्दल तुम्हांला प्रत्येकीं पांच-पांच रुपये दंड. दंडाची रक्कम गांवांतल्या तालमीला जमा करण्यांत येत आहे. ( लोक हंसतात. )

लोकः—बराबर न्याय झाला. नाय तर कोर्टाच्या हिसक्यांत पैका गेला असता समद्यांचा. अस्सं होया पाहिजे. म्हंजी आमची खोडच जिरून जाईल कोर्ट खेळायाची. चला.

बा०:—चा घेऊन जा. इथं मीटिंग हाय, आपुन तकडं बसूं. ( चहा व लोक घेऊन जातो. )

[ गुंडा दचकून घोंगडी व काठी सावरीत उभा राहतो. ]

गुं०:—कोन हाय तकडं...ऑं ! बोलत का नाय ? हरामखोरा, गप्प कां राहिलास उभा ? हलकटा, म्होरं पाऊल तर टाक, म्हंजी टक्कूरच फोडून टाकीन. आरं आकलंच्या कांद्या, तुझं कान फुटल्याती जनुं ? कां जिभेचा शेंडा कापलाय कुनी ? सडक्या मुर्द्या, तुला तोंड हाय का नाय ? कोन हाइस तूं ?

**आवाजः**--मी.

**गुं०**:--आरं मी कोन ? भूत, येताळ कीं बिरम राक्षस ?

**आवाजः**--मी, महाशब्दे.

**गुं०**:-- मी नाय वळखत.

**म०**:-- अरे मी महाशब्दे, रामाच्या देवळाशेजारी माझा वाडा नाहीं ? सरकारी रासनचं फेअर प्राइस नं. वनचा मालक महाशब्दे.

**गुं०**:--मला नाय माहीत.

**म०**:--हा काय चावटपणा ?

**गुं०**:--हा चावटपणा नाय. आमच्या सेनापतीचा हुकुम हाय. आमच्या फौजेचा नियम हाय हा कीं परवलाबिगर कुनाला सोडायचं नाय. अंधारांत मी महासबुद वळखत नाय न् महा महा सबुद पन वळखत नाय.

**महा०**:--मी पण नाहीं वळखत. हा चाललों परत.

**गुं०**--तूं बरा जाशील. मी तुला जाऊं देईन तवा ना ? गोफन हानून मुर्दा पाडीन.

**महा०**:--अरेच्या, येऊंहि देत नाहींस व जाऊं पण देत नाहींस !

**गुं०**:--परवल सांगाया जीव का जातो तुझा ?

**महा०**:--ज्यानें कॉंग्रेसमध्यें फूट पाडून कॉंग्रेसचे तीन तेरा केले त्याच्या नांवाचा परवल उच्चारूं ?

**गुं०**:--आर तुझ्या. नांव न घ्यायला काय नवराबिवरा हाय तो तुझा ? परवल सांग नाय तर लंबा करतों. ( धांवून जातो. )

**महा०**:--सु-भा-ष-चं-द्र. ( कष्टानं तो शब्द उच्चरतात. )

**गुं०**:-- चल म्होरं ये. असा रडतुस कशापायीं, त्या महा पुरसाचं नांव घ्याया ?

**झगरीकडून एक आवाजः**--या हो महाशब्दे. पोराचं काय मनावर घेतां ?

**महा०ः**—अहो, ज्या इसमाला आम्हीं डोक्यावर घेतलं त्यानं आम्हांला पायाखालीं तुडवलं, त्याच्या नांवाचा परवल ठेवतां ? म्हणे अहिंसा व्रताला काळं फासून ह्या आतां जपानच्या मदतीनं आमच्या गळ्यांत स्वातंत्र्य बांधणार !

**एकजणः**—अहो, तुमचा ' ह्या ' कोण ?

**महा०ः**—तुमचा ' तो ' तो माझा ' ह्या '. तुम्ही आज परवल ठेवला त्याच्या नांवानं.

**दुसराः**—कोणाकडून कां होईना, आमच्या देशाला एकदांचें स्वातंत्र्य मिळू द्या. जपान्यांकडून काय पण चिनीनिग्रोकडून मिळालें तरी चालेल.

**वि०ः**—तें समदं राहूं द्या. ह्यो पत्र दिलंय तुमच्या मित्रानं, तेव्हढं वाचून पाहा कीं. ( पत्र देतो व त्यावर टार्चचा उजेड पाडतो. )

**महा०ः**( पत्र वाचतात ) " पत्र घेऊन आलेले इसम मृत्युपथकाचे सैनिक आहेत. त्यांना मनःपूर्वक मदत द्यावी व पत्र फाडून टाकावें. आपला कृपाभिलाषि जयवंत. " सही न् हस्ताक्षर जयवंतचं आहे यांत शंका नाहीं. सांगा तुम्हाला काय मदत पाहिजे ती ?

**एक वीरः**—आम्ही तुमच्या गांवचं स्टेशन जाळणार. रेल्वेचे रूळ उखडणार. पॉवर हौस भस्मसात करणार न् मग मामलेदार कचेरीवर मोर्चा नेऊन ती ताब्यांत घेणार.

**महा०ः**—मला नाहीं हें पटत. ही हिंसा आहे.

**एक वीरः**—नाहीं. न्यायाधिशानं दिलेली फाशी न् डॉक्टरच्या शस्त्र-क्रियेनें मेलेला रोगी ही हिंसा नाहीं. शिवाय हिंदुस्थानचं प्रेम हेंच आमचं सत्य न् हिंदुस्थानचं रक्षण हीच आमची अहिंसा. आम्ही दुसरं तत्वज्ञान ओळखत नाहीं.

**महा०ः**—मला नाहीं हें पटत.

**दुसरा वीरः**—घरभेदे, पोलिस न् सरकार प्रजेवर जुलुम करीत आहेत. बायकांची अब्रू घेत आहेत, अर्भकांना ठार करीत आहेत. अशा

वेळीं तुम्हाला हें पटलं नाहीं तर तुम्ही चोर तरी आहांत नाहीं तर मूर्ख. वैष्णवांच्या देवानं दैत्यांचा संहार करण्याकरितां दहा वेळां अवतार घेतला आहे. समजलांत ? मऊ मेणाहून आम्ही विष्णुदास कठिण वज्रासी भेदूं ऐसे.

महा०:—मला नाहीं बुवा हें पटत.

तिसरा वीर:—तुम्हाला पटणार तरी काय ? गांधींची अहिंसा वीराची आहे. ती कांही भ्याडाची पळवाट नाहीं. उद्यां तुम्हाला स्वातंत्र्य मिळालं न् परचक्र आलं तर हिंसा होते म्हणून तुम्ही लढणार नाहींत ?

महा०:—सैन्य उभारूं. पण सत्याग्रही वीरांचं !

वीर:—डोकं फुटण्याची वेळ आली आहे. सत्याग्रही सैन्य ठेवणार म्हणजे काय ?

महा०:—सत्याग्रह करण्यास तयार असलेल्या स्वयंसेवकांचीं नांवं नोंदवणार.

वीर:—म्हणजे किती ?

महा०:— अजमासे दहा ते वीस लाख.

वीर:—येवढे !

महा०:—चालू युद्धांत इंग्लंड, अमेरिका, रशिया, जर्मनी यांचीं सैन्यं काय कमी होती यापेक्षां ?

वीर:—( हुशारून ) मग काय येवढ्या सैन्यानिशीं लढाई मारणार ?

महा०:—छट्. लढाई म्हणजे हिंसा, हिंसा म्हणजे भ्याडपणा. लढाई करून आम्ही आपली मान कधींहि खालीं घालणार नाहीं.

वीर:—मग येवढं सैन्य उभारून त्याचं काय करणार ?

महा०:—रोज शंभर या प्रमाणं सुरवातीला बलिदान करणार. पुढं ती संख्या हजारावर नेतां येईल.

**वीर:**—इतक्या आत्महत्या ऊर्फ बलिदान तुम्ही कशाकरितां करणार ?

**महा०:**—इंग्रजांचें हृदयपरिवर्तन करण्याकरितां.

**मं०:**—त्यापरीस गेंडीच्या दुधाची डेअरी कां नाहीं काढीत ?

**महा०:**—बस्स झालं. अराजक माजवून तुम्ही आमचा व्यापार न् उद्योगधंदे बुडवणार, देशाचा सत्यानाश करणार. येतों आतां.

**मं०:**—यास्नी डिवंचून तुम्ही यास्नी सूक्षम सोडणार ? ह्या काळाबाजार-वाला पोलिसला आतून खबर देईल.

**वीर:**—हं, गुंडा, उचल यांना आन् ठेव कोंडून खंडोबाच्या घळींत. पाहरा मात्र कायम ठेवा.

**महा०:**—मी अन्नसत्याग्रह सुरू करीन मला सोडीपर्यंत.

**मं०:**—जरूर करा. म्हंजी भुकेनं गरीबांना काय यातना तुम्ही देतां तें तरी कळेल तुम्हास्नी. ( महाशब्यांना उचलून नेतात. )

**वि०:**—एकदां भारतांत अहिंसा, सत्य हीं बलिष्ठ क्षत्रियांचीं भूषणं झालीं होतीं. तीं धारण करण्यापूर्वी आम्हांला प्रथम बलिष्ठ क्षत्रिय झालं पाहिजे. ( कोंबडा आरवतो. ) पहाट झाली. उजाडायच्या आंत सर्व-जण पांगा.

**बा०:**—चल. वांगी खुडायची हायित.

**गुं०:**—आन पाखरं कोन हाकील ?

**मं०:**—मी. तूं जा मळींत. मी आल्येच. तेव्हढी आगटी विझव न् मंडळी जमल्याच्या खुणा पुसून टाक जायच्या आधीं. ( गुंडा त्या कामाला लागतो व मंजूळ पडळीकडं जाते. पुन्हा कोंबडा ओरडतो. गुंडा निघून जातो. तांबडं पडतं त्या रंगांत गोफण फिरवीत मंजूळ गात गात माळ्याकडं येते व माळ्यावर चढते. पांखरांचा हाकारा करते. )

मं०:—

रातिं पडलं दहिंवर, आला मज गहिंवर, आलि सराईसुगी ॥
रडुं नको पळभर, हासुं आण मुखावर, पोरि, तूं राही उगी ॥ १ ॥
संपला पाऊस, आलि मज हाऊस, नदि वाहे झुळझुळा ॥
माळावर लिंबुर, मळिमधिं मका रसरसला दुधखुळा ॥ ॥ २ ॥
उडतात भोरड्या, तशा पखुरड्या, मटकीवर कीं मुगीं ॥
हरळिकुंद्याला सोडुन शिरती शेतामधिं मृगमृगी ॥ ३ ॥
शेवति उलगे, निघाले हुलगे, तिळ वाजवि खुळखुळा ॥
मोतिसर काळिंत, सोनसळं गव्हाळिंत, हुरड्यावर शाळूहुळा ॥ ४ ॥
बारा गांवबलुति, सोळा तशी अलुति, धान्यं पिकलीं आठरा ॥
पिकली भाकर, उडवी पांखरं, हाण गोफण गरगरा ॥ ५ ॥
करकरा वाजे, गुऱ्हाळ माझे, न्याहरिस गुळ काकवी ॥
भाकरिसंगं खात माळ्यावर ललकारी गिरकवी ॥ ६ ॥
गेला दिस खालीं, सांज रात झाली, पडं थंडीची हुडहुडी ॥
मउ मउ गोधडी, उबदार घोंगडी, लावु आंतुन पासुडी ॥ ७ ॥
आंतर पारखा, आला मम सखा, उलि उरली धुगधुगी ॥
रातभर दहिंवर पडुं देत महिंवर, झालि सराईसुगी ॥ ८ ॥

हाः हूः हार्र. हूः

[ बुलबुलतरंग गळ्यांत अडकावून शरद् शाळूच्या पिकांतून गात, नाचत व हातवारे करीत माळ्याकडं येतो. ]

शरद्ः—पाखरे करति किलबिल् । वाहतो झरा झुळझुळ् ॥
जाहल्या तिन्हि सांजा । सखे मी करी चुळबुळ् ॥

मं०—आन् रामाच्या पारीं !

श०:—गुलाबाच्या पाकळ्या या। कपोलीं करति गुलगुल्॥
म्हणूनीं स्तुतिस्तोत्रें। कुंजि गातात ग बुलबुल्॥

[ त्याच्या हातवाऱ्यांना पाहून मंजूळ हंसते. ]

श०:—अशीच हास.

मं०:—हंसूं नको तर काय रडूं ?

श०:—ग्रामकन्यके, काय तुझं नांव ?

मं०:—मंजूळ.

श०:—मंजूळ! तुझं नांव मंजूळ, तूं बोलतेस मंजूळ, हासतेस मंजूळ. गातेस मंजूळ. तुझं सगळंच मंजूळ!

मं०:—पाव्हनं, पन ही ममई न्हाई. किस्नाकांठ हाय हा. इथलं लोक लई बांड हायित. ते तुमास्नी नाय झेपायाचं.

श०:—अहाहा! किती गोड लागते ही ग्रामीण भाषा कानाला! आमुची खरी मराठी मायबोली ती हीच. किती मंजूळ! न्हाई, लई, पानी, आनी, बानी, ग्वाड, बगाळ. मंजूळ, मराठमोळ्याची प्रत्यक्ष सारजाच दिसतेस तूं! मंजूळ, माझी एक गोष्ट ऐकशील ?

मं०:—ऐकण्यासारखी असली तर ऐकाया व्होवी.

श०:—कृष्णाकांठच्या या रांगड्या मुलखांत तुझं आयुष्य फुकट जात आहे! तूं माझ्याबरोबर मुंबईला चल.

मं०:—कशाला ? साचं भराया ?

श०:—असलं पाप माझ्या हातून कधींच व्हायचं नाहीं. तुझा गळा मूळचाच गोड आहे. तिथं मी तुला गाणं बजावणं शिकवीन.

मं०:—मग ते नगं अप्नास्नी. ममईला शाळू हाय ? हुरडा हाय ? बाबरं, मळई, कृष्णाकांठ हाय ?

श०:—मुंबईला समुद्र, चौपाटी, मलबारहिल्, मोठी बिल्डींगज् न गंमत आहे.

मं०:—गंमत हाय करम. ममईला खारं पाणी, काळं डांबर, काळा कोळसा न् घणघण आवाज हाय मातुर.

श०:—तिथं माझ्या ओळखीचा एक सिनेमा-डायरेक्टर आहे. तो तुला कैलासावर नेऊन बसवील.

मं०:—इतक्यांत मला मरायची हौस नाय.

श०:—तो तुझी सगळी हौस फेडील. तो तुला मोटारगाडींत बसवील. तुला उत्तम कपडे देईल. स्नो, पावडर, ओठाचे रंग, वासाचीं तेलं, अत्तर लव्हेंडर देईल. उत्तम खायाप्यायला देईल. तुला स्वर्गातील परी बनवील.

मं०:—आन् अखेर जवानी संपली कीं हाकून बी देईल. नग. नग. मला ती वंगाळ ममई.

श०:—मंजूळ, मी एक कलावंत आहें. तुला गाणं-नाचणं शिकवलं नाहीं तर कलेची हानी होईल म्हणून जीव चुटपुटतो.

मं०:—त्येला ममई कशाला होवी? हथं शिकवा कीं!

श०:—इथं नको. इथं तुझा तो आहे ना?

मं०:—कोन? माझा रामोशी? त्येला भितां?

श०:—मी त्याला भीत नाहीं. पण तुला आहेना त्याची भीति?

मं०:—त्येला भ्याया मी काय चव्वल खाल्लेत त्याचे? या इथं. आन् होऊं द्या तुमचा नाच न् गाणं.

श०:—पण तो माळा हालेल ना?

मं०:—मग तर लईच गंमत येईल. मी नुसती साधी पुरी नाय राहणार. झुलती परी व्हईन. ह्यो पघा. [ माळा हालवून दाखवते. ] या वर.

[ शरद् वर चढण्याचा प्रयत्न करतो, पण त्याला चढतां येत नाहीं. मंजूळ त्याला वर ओढून घेते. शरद् धडपडत वर चढतो. ]

श०:—पहिल्यान् तुझी ती गोड लावणी होऊं दे.

[ मंजूळ गाते. शरद् नाचतो. माळा मोडायाला होतो. शरद् पडतां पडतां वांचतो. मंजूळ त्याची नकल करते व हंसते. ]

श०:—मंजूळ, मंजूळ, मंजूळ. [ हृदयावर हात ठेवतो व दाबून धरतो. ]

मं०:—असं कावं वरडतां ? इचु चावला जनु ?

श०:—मंजूळ, एक काय पण सहस्र विंचु, इंगळ्या एकदम् चावल्या आहेत मला.

मं०:—शाळूंतलं इचू लई वंगाळ. फार चढत्यात.

श०:—होय अगदीं तशाच वेदना होत आहेत मला.

मं०:—व्हया ना ? अक्षि माझ्या गळ्याशपथ ?

श०:—अगदीं तुझ्या गळ्याशपथ.

मं०:—कुठं फणका मारतो ?

श०: या इथं. ( हृदयावर बोट ठेवतो. )

मं०:—थतं कोलताचा डाग दिल्याबिगार तो नाय उतरायाचा. मी पडवींतून कोलीत घेऊनशानी येतें.

श०:—नको. नको. तुझ्या नुसत्या स्पर्शानें उतरेल तो.

मं०:—अस्सं व्हय ? ( त्याला कडकडून मिठी मारते व दाबते. )

श०:—मंजूळ, सोड. सोड. बरगड्या मोडल्या.

मं०:—उतरला कीं नाय ? उतरला कीं नाय ?

श०:—उतरला. उतरला. सोड. सोड. पायां पडतों. सोड.

[ यल्ली पिठा भरल्या हातानें बाहेर येते. ]

य०:—हात मेल्या ! तुझा मुडदा नेला मसणांत. गुंडा, घरधनी, धांवा. मेल्यानं मंजूळाला धरली. पिठाच्या हातांनीं म्यान्च थोबाड रंगावलं असतं आन पांची बोटं उमटवली असती; पन भाकऱ्या लावल्याती भाजत. करपलीच जनुं.

( मंजूळ शरदूला सोडते. तो माळ्यावरून खालीं उडी मारतो, यल्ली घरांत जाते. )

मं०:—पाव्हनं, हा किस्नाकांठ हाय. ध्यानामंधी धरा. जावा आतां. पळा. इकडून नगा. तकडून जा. इकडून तो बगा माझा रामोशी आला. पळा बेगी बेगी.

[ शरद् पळत जातो. त्याच्या मागं विश्वास पळत जातो. दुसऱ्या बाजूनं गुंडा व बाजा येतो. ]

बा०:—आरड कसला झाला ?

गुं०:—ममईच्या पाव्हन्यानं धरली व्हय तुला ! आतां रगडतों त्येचीं हाडं. ( पडद्यांत शरद् केविलवाण्या आवाजांत ओरडतो. )

श०:—अर्ज्या, अर्ज्या, मारूं नकोस. पुन्हा नाय करणार.

गुं०:—अर्ज्या बांबकतोय जनुं ममईच्या पाव्हन्यास्नी.

मं०:—बाजाबाबा, गुंडा, जा. धांवा. त्या पाव्हन्यास्नी सोडवा. नाय तर ठार मारील तो रामोशी त्येला. जा. माझ्या गळ्याची शपथ हाय.

[ बाजा व गुंडा जातात. ]

मं०:—ए अर्ज्या ! ए अर्ज्या ! बस झालं. मरंल तो.

बा०:—( पडद्यांत ) अरं, बस. बस. किती मारतुस त्येला. मरल ना तो ठार. बस कर आतां. चल.

गुं०:—सोड. सोड. चल. हो म्होरं.

( बाजा व गुंडा अर्ज्याला स्टेजवर ओढीत आणतात. )

वि०:—तुम्ही आलांत म्हणून. नाहींतर खलास केला असता त्याला. सोडा मला.

मं०:—माझ्या गळ्याची शपथ हाय.

वि०:—तुला धरली आन् तूंच शपथ घालतेस !

मं०:—त्यो काय धरतो मला ? पाजवलेला इळा हाय कमरेला.

वि०:— तुला धरली ती म्या पघितली आन् तूं काय नाय म्हंगतेस ?

मं०:—अव तो चावनटपना कराया लागला तवा मीच धरला त्येला दाबून न् मोडल्या त्याच्या बरगड्या. आन् काढलं त्याचं पिरिम भाहिर. तो काय धरतो मला ? असा दावला किस्नाकाठ कीं पुना नाय जायचा बाटस. [ सर्व जण हंसतात ]

बा०:—अस्सं व्हय पोरी ? चांगला किसना काठ दावलास.

गुं०:—थुत तुझ्या बिन. वांग्याचा खुडा टाकुनशानी उगाच धावत सुटलों. बाबा, चल. काम लई पडलंय.

[ दोघेहि जातात. ]

वि०:—जरा आणखी दाखवतो त्याला म्हणजे जन्माची आठवण राहील.

मं०:—जाऊं द्या. त्याला काय समजतंय ! पोर आहे तें अगदीं. तुम्ही एक धसका मारला तर डोळे पांढरे करील तो.

वि०:—करीना ! म्हणे पोर आहे ! अपराध्याला शिक्षा ही झालीच पाहिजे. युनिव्हर्सिटीचं शिक्षण घेऊन देखील त्याला संस्कृति आली नाहीं.

मं०:—हा त्याचा अपराध नाहीं. माझा आहे. आतांपर्यंत मला हाच अनुभव येत राहिला आहे. सर्व पुरुष सारखेच आढळले मला. तुम्हीहि एकतारी घेऊन नव्हतां का माझ्या मागं निघाला ?

वि०:—निघालों होतों खरा. पण संयम पाळला न् मागं फिरलों. शिवाय तुझ्या रूपयौवनावर भाळलों नव्हतों. तुझ्या गाण्यांतील देशभक्तीनं मी वेडा झालों होतों.

मं०:—तेंच. तेंच. फक्त शब्द निराळे. पण अर्थ एकच. अशा तऱ्हेनें प्रेमाचे पायीं किती तरी खरोखरीचे देशभक्त बनले आहेत!

वि०:—खरंच. मुंबईला असतांना असाच एक पागल तरुण मीं पाहिला होता. हा न् तो एकच असावा असं वाटतं. काय बरं ह्याचं नांव ?

मं०:—रावबहाद्दुरांच्या लेकीनं त्या दिवशीं काय बरं हाक मारली त्याला ? विसरलें मी. हां ! आठवलं आतां त्याचं नांव.

वि०:—मला पण आठवलं. शरद् आठवले त्याचं नांव. तोच तो. पोरीशीं अंगलट करायला मिळावी म्हणून तो आमच्या पथकांत आला होता. पण काय ग मंजूळ, त्याचं प्रेम दाबून काढलंस तसं माझं नाहीं कुठं काढलंस ! माझ्या नाहीं कुठं पडलीस गळ्यांत !

मं०:—भ्या वाटतंना मला तुमचं !

वि०:—माझी कसली भीति ! मी अतिप्रसंग करीन म्हणून !

मं०:—त्याची कसली भीति !

वि०:—मंजूळ, मंजूळ, तीच का तूं मंजूळ ! अगं स्त्रीला त्याची भीति नाहीं मग दुसरी कसली भीति असते !

मं०:—एकदां गळ्यांत पडल्यें तेव्हां पळून गेलांत. दुसरून पडलें तर पुन्हां पळून जाल ही भीति !

वि०:—म्हणजे !

मं०:—हें बघा. विसरलांत ! [ हाताच्या पोटऱ्या दाखविते. ]

वि०:—पुन्हा विलक्षण योगायोग. माझ्या बायकोच्या पण हातावर अशाच मंजुळा गोंदवल्या होत्या.

मं०:—पण हा योगायोग नाहीं आतां.

वि०:—मला नाहीं कळत तुझ्या बोलण्याचा अर्थ.

मं०:—तुमच्याच बायकोच्या–धर्मपत्नीच्या हातावर या गोंदवल्या आहेत. बघा तपासून. ही तुमचीच बायको आहे कीं नाहीं तें.

[ विश्वास तपासण्याकरितां मंजूळचे हात हातांत घेतो. ]

मं०:—गोंदवलेल्या मंजुला काय तपासतां ! बायको तपासून बघा कीं.

वि०:—तपासली. तूंच माझी मंजूळ. आतां तुझ्या एकेक बोलण्याचा अर्थ माझ्या लक्षांत येऊं लागला.

मं०:—स्वतः या भागांत आल्याचं मला कळलं म्हणून मी स्वतःच्या मागोमाग इथं आलें. दैवानं आपली ताबडतोब भेट झाली.

वि०:—इथं निंबगांवहून आलीस ?

मं०:—नाहीं. माहेराहून आलें. स्वतः चळवळींत पडून फरारी झालांत म्हणून पोलिसांनीं न् मिलीटरीनं मामंजींचा छळ केला. त्या धस्क्यानं सासूबाई वारल्या. मामंजींना संधिवात झाला. बायकांची अब्रू निंबगांवला सुरक्षित राहिली नाहीं म्हणून त्यांनीं मला माहेरीं पाठविली. मी अशिक्षित म्हणून स्वतःचा माझ्यावर राग होता. त्याकरतां मीं शिकण्याचा निश्चय केला व तीन वर्षांत मराठी सात न् इंग्रजी चार यत्ता केल्या न् माझा देश ज्या चळवळींत दाखल झाला त्यांत मी पण सामील झालें.

वि०:—मग मला कां नाहीं हें सांगितलंस आधीं ?

मं०:—एक तर मला आणखी खात्री करून घ्यायची होती आन् दुसरून मला स्वीकारतां कीं नाहीं हें पहायचं होतं. त्याहिपेक्षां मला आपल्याला सुरक्षित करावयाचं होतं. म्हणून मी ताबडतोब गांवांत गेलें. तिथं मला पोलिसपार्टी तुम्हाला पकडण्याकरितां आली आहे असं कळलं; तेव्हां स्वतःला पळून जायला वेळ मिळावा म्हणून चावडीसमोर माझ्या गळ्याचा उपयोग करीत बसलें. मग जेवणन् कानस झोळींत घेऊन परत पडळींत स्वतःला शोधीत आलें.

वि०:—मग त्या वेळीं तरी तूं आपलं रूप प्रकट करावंस कीं नाहीं ?

मं०:—खरं सांगूं ? मग स्वतःचा व्रतभंग करून मी देशाच्या आड नसतें आलें ?

वि०:—नसतीस. कारण मी देशाइतका तुझाहि ऋणी आहें. आज वनवास मला सिंहासनाइतका गोड वाटत आहे. कारण माझी झांशीची राणी. ( तिचा हात पकडतो. ) चल, नदीवर बसून घराकडल्या गोष्टी बोलूं.

मं०:—मी तुमच्या गनिमी पथकाची नेती आहें. तुम्ही माझी आज्ञा मोडीत आहांत.

वि०:—आजच्या दिवस लोकराज्य बरखास्त करून हुकुमशाही स्थापन झाली आहे असं समज. ( तिला ओढून शाळूचे पार नदीकडं नेतो. बाजा, गुंडा बांग्याच्या टोपल्या घेऊन येतात. )

बा०:—( टोपली ठेवून ) गुंडा, सबूर. सबूर.

गुं०:—( टोपली ठेवून ) समदी कशी सारखी ! कुठं चालवली त्यानं मंजूळला ? आन् ती पन चाललीया त्याच्या हातांत हात घालून.

बा०:—गुंडा, जा बाबा त्यांच्या मागं. पन दंगामस्ती करूं नगस. रामोशाचा सबुद हाय मी तिला लेकीवानी सांभाळीन म्हून.

( गुंडा जातो. रावबहाद्दूर येतात. )

रा. ब०:—बाजा, गेली दहा वर्षे मी तुला आसरा दिला, म्हणून तूं वांचलास.

बा०:—आन् मी बावगा वागलों ? आजूबाजूंचं समदं दरवडं तुमच्या घरांत घातलं न् शिरिमंत केलं तुमास्नी.

रा. ब०:—अरे, आपण आणखी श्रीमंत होऊं अशी संधि आली आहे. लढाईच्या कंत्राटांत मीं लाखों रुपये मिळविले. पण दुसऱ्या लोकांनीं इतका पैसा मिळविलाय कीं मला भिकाऱ्यासारखं वाटतं त्यांच्यांत बसतांना. त्यांना लुबाडलंच पाहिजे.

बा०:—जय मल्हार. आपुन तयार हाय.

रा. ब०:—अरे काळाबाजार, मिलिटरीचीं न् मुलकी सरकारचीं माल-पुरवठ्याचीं कंत्राटं आणि लांचलुचपत यांनीं लोक भयंकर श्रीमंत झाले आहेत. त्यांना साफ करायच आपण चोराबर मोर होऊन.

बा०:—हाः हाः हाः ! उगीच नाय केला सरकारनं धन्याला रावभाद्दूर ! डोस्कं पन डोस्कं हाय घागरीवानी.

रा. ब०:—आन् बाजा, गंमत तर न्यारीच आहे. या लोकांना लुबा-डलं तरी हिंमत नाहीं व्हायची त्यांची पोलिसांत फिर्याद द्यायची. सरकार त्यांना विचारील येवढा पैसा तुम्ही आणला कुठून ?

बा०:—रावभाद्दूर, मी म्हंगत व्हतों तो रामोशी असा जवान पोरगा हाय कीं यंव ! आपल्या उपेगी येईल.

रा. ब०:—लिली पण त्याची माहिती सांगत होती. आपण पांढऱ्या

टोप्या, खादीचे कपडे घालून महात्मा गांधीकी जय करीत दरवडे घालायचे म्हणजे आळ जाईल कॉंग्रेसच्या लोकांवर. कारण ते सरकारी खजिने लुटत आहेत.

बा०:—पन हत्यारांची सोय काय !

रा. ब०:—त्याची नको काळजी ! पोलिसांची आपणांला हवी ती मदत मिळेल. हा घे दोनशें रुपये बयाणा. ( बाजा हर्षानें पैसे घेतो. )

बा०:—उद्यापून दरोड्यास्नी सुरवात.

रा. ब०:—तेवढ्यानं नाहीं भागायाचं. फरारी निंबगांवचा आहे असं मला फौजदारानं सांगितलं आहे. पहिल्यांदां माझ्या लक्षांत आलं नाहीं कीं तूंही निंबगांवचा रामोशी आहेस. तूं फराऱ्याला पकडून दिलं पाहिजेस. माझी पक्की खात्री आहे कीं, तो याच हद्दींत आला आहे. तो तुझ्या डोळ्यांतून कांहीं सुटणं शक्य नाहीं.

बा०:—वीस वर्सं झालीं म्यां गांव सोडला. इस्वास मला आठवत बी नाय.

रा. ब०:—पण अर्ज्या रामोशी हाय ना तुझ्या गांवचा ? त्याला तुझी ही कामगिरी सांग.

बा०:—रावभाद्दूर, मीं इमान सोडलं नाय. येव्हढी कामगिरी सांगूं नगा. कसं झालं तरी इस्वास गांवचा पोर हाय. त्येचा गळा कापूं ? आतां तुम्हाला काय कमी हाय. उदंड पैका झालाय. आतां काळ्या कुत्र्यांची खुशामत कशापायीं करतां !

रा. ब०:—आग लाव तुझ्या पैशाला. लखपतीची राख सावडली कीं नांव नाहीं काढीत कुणी त्याचं तिसरे दिवशीं. नांवाकरतां लोक घोड्यांना पाणी पाजण्याचे हौद बांधतात, शाळेला पैसे देतात, काय वाटेल तें करतात. रावबहाद्दूरचा राजाबहाद्दूर व्हायचं आहे मला सरकारची कामगिरी करून.

बा०:—तुम्ही तकडं राजं व्हा नाय तर परधान व्हा. आपनास्नी हें जुळायाचं नाय. हा घ्या तुमचा बयाणा परत.

रा. ब०:—मी दिलेले पैसे परत घेत नसतों. बाज्या, तूं खुनी फरारी आहेस ही मख्खी मीच एकटा जाणतों. ह्येः ह्येः ह्येः !

बा०:—आन् त्येचं गिरमिट लावून तुम्ही मला वाल्ह्या कोळी बनवलेत. रावभाद्‌दूर, आतां नगा बघूं बाजाचा अंत. त्येला देवाचं नांव घेऊं द्या.

रा. ब०:—बाजा, जिवापरीस कांहीं प्यारं नाहीं. ह्येः ह्येः ह्येः !

बा०:—तोबी घ्या. तो तुमच्याच हाय.

रा. ब०:—बाजा, मी तुला संधि देत आहें. वाटेल तें करून तूं मला फरारी पकडून दिला पाहिजेस. नाहीं तर मी पोलिसांत तुझी बातमी देईन. बोल लवकर. विचार काय करतोस ? (बाजा विचार करीत सुन्न उभा राहतो.)

रा. ब०:—अहो मानेसाहेब, या आतां. बाजा कामगिरी कबूल करीत आहे. (माने काठी टेकीत लंगडत येतात.) बाजाचा सबुद म्हंजी सबुद, बरं कां मानेसाहेब ?

मा०:—अग आईग ! इथं येऊन डोक्यांत खवडे पडले, दाढीवर चक्त्रा उतला म्हणून दाढी वाढवावी लागली. भरीला आतां नारू उपटला. आतां काय करूं ? (डोकं व दाढी खाजवतो.) आतां फरारी कसा पकडूं ?

रा. ब०:—धीर धरा. बाजा सगळं करील.

मा०:—बाजा, फरारी विश्वास पाटील बुडून मेला नाहीं. खंडोबाच्या जत्रेत, तुझ्या पडळीच्या आसपास तो सभा घेणार आहे अशी गुप्त दवंडी गांवोगांव पिटली आहे. गुंडानं त्याला पाहिलं आहे. मी वेष पालटून सभेला येईन न् गुंडाजवळ बसेन. गुंडानं त्याला ओळखलं कीं मी त्याला अटक करीन. गुंडाला नीट समजावून सांग. बरं का !

रा. ब०:—बाजा, ध्यानांत ठेव तुझा सबुद.

(माने व रावबहाद्‌दूर जातात. बाजा भकास डोळे करून पाहतो.)

बा०:—माझा सबुद ! माझा सबुद !

( एका बाजूनं गुंडा न् पडळींतून यल्ली पदरानं हात पुशीत येते. )

य०:—कुठं हाय मेला तो पघूं दे मला.

गुं०:—आई, तो ममईचा पाव्हना पळून गेला आन् मंजूळचंन् अज्यांचं नवराबायकोचं नातं निघालं.

य०:—आँ ! तें कुनी काढलं ?

( विश्वास व मंजूळ येतात. )

मं०:—एकवचनी रामाचा वंश सांगणारे बाजाबाबान् यल्लीआई, बळी पाटलाची सून तुम्हाला नमस्कार करीत आहे.

य०:—सतायुसी व्हा. मला वाटलं गुंडा चेष्टा करतुया.

वि०:—या रत्नाला मी टाकलं होतं माहेरीं. पण आडनांव घोरपडे नं. बराबर आली मागावर गळ्यांत पडायाला.

मं०:—बाजाबाबा, तुम्ही आशीर्वाद द्यानं. द्या. असें खिन्न कां ! काय झालं आहे तुम्हाला ?

बा०:—आशीर्वाद द्यायला पुण्याई लागते. खुनीदरोडखोरांचं हें काम नाय. पोरी, तुला कामं सांगितलीं म्यां चांडाळानं. (तोंड फिरवतो. )

य०:—आन् मी काय कमी हाय चांडाळीण ! बाळि पाटलाची लक्षुमी चालून आली घरलान् म्यां तिला नाय घातलं न्हाऊं कीं नाय कधीं मारल्या तिच्या वा.

वि०:—त्या सावकाश मार. पण बाजा, मंजूळनं मला घराकडली सगळी बातमी सांगितली आहे. आई वारली न् बाळिपाटील आजारी आहेत घरीं एकटे. मला जातां येत नाहीं. मंजूळला पाठवतां येत नाहीं, कारण तिथं लष्कर बसवलंय. तुला न् गुंडाला पण पाठवतां येत नाहीं. मग बाबांजवळ कुणाला पाठवावं ?

बा०:—जिरग्याची पाळी संपली आहे. तो जाईल. चल, आपुन त्याला इचारूं. पोरी, आज राखण गुंडा करील.

मं०:—शेतीचीं कामं करण्यांत शरम नाय मराठ्याच्या पोरीला. ही

काळी आय आहे आपली. खरी आई मरते; पण ही कधीं मरत नाय. चिमणीपासून राजाला जेवूं घालते. हिची सेवा केली नाय तर दुनिया उपाशी मरेल. मी राखण सोडणार नाहीं.

( बाजा-विश्वास एका बाजूला व गुंडा-यल्ली वांग्यांच्या टोपल्या घेऊन पडळीकडे जातात. मंजूळ माळ्यावर चढते व गोफण गिरकावीत गाते )

मं०:—रातिं पडलं दहिंवर, आला मज गहिंवर, वगैरे.

( डोक्याला पट्टी मारलेला शरद् येतो )

मं०:—अग आईग, केवढा मार लागलिया.

श०:—मंजूळ, तुझी ॲपॉलजी मागायला आलों आहें. करशील ना क्षमा ?

मं०:— त्यामंदी कसली क्षमा ? माझ्या रामोशानं तुमास्नी मारलं म्हून मीच मागाया होवी तुमची क्षमा.

श०:—मंजूळ, माफ कर. तुझ्या रामोशाला चुकवून इकडं आलों. त्याचं नांव काढूं नकोस.

मं०:—माझ्या रामोशाची कां म्हून इकती भीति ?

श०: —नको. नको. पायां पडतों त्याचं नांव काढशील तर.

मं०:—तुम्ही कशाला इकतं भ्येता ? सवाई रामोशी व्हा कीं तुम्ही.

श०:—तें कसचं जुळतंय मला !

मं०:—कां नाहीं जुळणार ? किस्नाबाईच्या बाळवंटींत सकाळसंध्या-काळ मेहनत करा, हुरडा खा, मर्दुमकीच्चीं कामं करा; म्हंजी तुम्ही पन बनाल सवाई रामोशी. आन् पडाल देशाच्या उपयोगीं.

श०:—मंजूळ, कोल्हाटीण असून किती मोठा विचार करतेस ? आज-पासून तुझी आज्ञा शिरसावंद्य. ( तिच्या पायांवर डोकं ठेवतो. )

मं०:—छट्, छट्. उठा कीं. ( त्याला उठविते. )

श०:—मंजूळ, तूं सांगशील तें मर्दुमकीचं काम करीन. हुरडाचर्वण तर आतांपासूनच सुरू करतों. (शाळूचीं कणसं तोडून एकएक दाणा तोडून खाऊं लागतो.)

मं०:—शरद् भाई, असा नाहीं हुरडा खायचा. असा मळायचा न् असा बकांदा मारायचा. (त्याच्या तोंडांत मळून काढलेला हुरडा घालते. शरद् पण तिचं अनुकरण करून हुरडा खाऊं लागतो.)

श०:—मंजूळ, तुझी भाषा बदलली. कोण आहेस तूं! कुणी भूमिगता?

मं०:—तसंच समज. आतां रांगड्या भाषेचं ढोंग ठेवण्याचं कारण नाहीं. आजपासून तूं अर्ज्याच्या हाताखालीं तालिम सुरू कर.

श०:—कोण अर्ज्या! तो रामोशी!

मं०:—भिऊं नकोस. तो रामोशी माझ्या हुकमांत आहे.

श०:—आजपासून मी पण तुझ्या हुकमतींत आलों असं समज.

मं०:—माझ्या नव्हे. आमच्या म्हण. (त्याच्या खांद्यावर हात ठेवून) होय ना! शरद्, सगळे शेतकरी सरकारविरुद्ध होऊन आमच्या गनिमी पथकांत दाखल झाले आहेत. देशाची शपथ घेऊन त्यांनीं आपला सबुद दिला आहे आम्हाला. तूं देशील आम्हाला तुझा सबुद. बोलत कां नाहींस!

(शरद् खिशांतून आरसा काढून दाभाडाचा सांधा किती सुजला आहे हें पाहतो, व हुरडा खाल्ल्यामुळं बोलतां येत नाहीं असं ॲक्टिंग करतो. मंजूळ त्याचा अर्थ समजते व मोठ्यानं हंसते.)

मं०:—माझ्या जाईच्या सुकुमार फुला, मूठभर हुरडा खाल्ला नाहींस तर दाभाड आवळलं. शेरभर खायाला लावीन तुला तरच होईन कृष्णा-कांठच्या शेतकऱ्याची लेक.

श०:—(मोठ्या प्रयत्नानें बोलतो.) मजूळ, दिला. माझा सबुद दिला. देशाला दिला. (पड्यांतून आवाज येतो–'ए अर्ज्या, ए अर्ज्या, ए रामोशा! शरद्, मंजूळ शाळूंत लपतात. विश्वास धावत येतो आणि शाळूंत

लपतो. त्याच्या मागून पाटी-पेन्सिल घेऊन लीला येते. मंजूळ व शरद् झाळूच्या आडोशाला उभी राहतात. )

ली०:—कुठं ग गेला बाई हा रामोशी ? इतक्यांत उंसाच्या फडाजवळ पाहिला कीं त्याला. पदरमोड करून पाट्यापेन्सिली घ्याव्यान् या लोकांच्या मागं लागावं, आन् हे आपले पळतच सुटतात. हाँ. हा पहा सांपडला. मला चुकवून पळतो काय ? ( विश्वासचा कान धरून त्याला बाहेर काढते व पाटी दाखवते.) हं, हें अक्षर काय ? वाच.

वि०:—ग ! ग ! ग ! किती ग काढल्याती म्यां ? बोटं नुसतीं आंबुन गेल्याती. लीलाताई, तुम्ही मला हरणं पकडाया सांगा, दरोडा घालाया, चोराचा माग काढाया सांगा. पन ही कटकट नका लावूं मागं. हें बघा, मूर्ख सबुदाचा धडा वाचतात, शेणं सबुद सोडलेला धडा वाचतात, आन् मर्द बिन सबुदाचा. आम्ही करून दावतों. बोलून नाय.

ली०:—अरे बाबा, विद्येसारखं धन नाहीं.

वि०:—आन् आमची ही काय इद्या नाय व्हय ! आमच्या इद्येची सर नाय येणार तुमच्या इद्येला. तो ममईचा पाव्हना लई शिकलाय म्हनं. पन मी एक लाफा दिला तर कोलमडलान् खोक पाडून घेतली त्येनं डोसक्याला.

ली०:—तूं शरद्‌ला मारलंस ? न् तें कां ?

वि०:—त्येनं माझ्या मंजूळची खोडी काढली.

ली०:—तुझी मंजूळ ! कोण ? ती कोल्हाटीण ना ?

मं०:—( पुढं येऊन ) व्हंय. कोल्हाटीणच. पन माझ्या रामोशाची हाय.

ली०:—इतक्यांत तुझा रामोशी झाला ?

मं०:—माझाच हाय तो. माझा नाय तर कुनाचा ? त्येच्या नांवचं हें लेणं घालतें मी. आमच्यामागं लागून कां आम्ही तुमची इद्या शिकूं ? तुमच्या कलेक्टर सायबास्नी खूष कराया आन तुम्हाला मोठेपण देऊन

मिरवाया ! आम्हाला आमची कळ वाटली कीं आम्ही आपसुक शिकूं. तुमचा फुकटचा धरमडाव नगं आम्हास्नी. ह्योच पथ. तूं अर्ज्याच्या मागं धावतेस. पण तो शिकत नाय. पन मी मनांत आणलं तर त्येला एका दिवसांत बी. ए., एम. ए. करून टाकीन. खरं कीं नाय, माझ्या रामोशा !

वि०:—व्हय. व्हय. अक्षि खरं.

मं०:—बघ कसा हाय माझ्या हुकमांत. ए रामोशा, या नाजुकरावला घेऊन जा आन् रामोशी बनीव तुझ्यावानी.

वि०:—(शरदूला) हो म्होरं.

(शरद् आपण जोर बैठका मारून पहिलवान होणार असं ॲक्टिंग करून निघून जातो.)

ली०:—शरद्, शरद् मागं फीर.

मं०:—तो नाय आटपायचा तुला. तो आतां रामोशी झालाय.

ली०:—मी पण बनेन रामोशीण. बनेन काय आहेंच मी.

मं०:—फुकाच्या नाय या गोस्टी. रामोशी नवऱ्याची कळ रामोस्नी-बांचून कुणी काढनार नाय.

ली०:—काय तुझं नांव ? मंजूळ नाहीं का ? मंजूळ, मेहनत केली तर शरद् अर्ज्यासारखा दिसेल ?

मं०:—अर्ज्याहून उजवा.

ली०:—मंजूळ, तुझा अर्ज्या किती सुंदर दिसतो; आणि तूं पण. पुरुषप्रकृतीप्रमाणं दिसतां तुम्ही या वावरांतून हिंडतांना. सिंह म्हणे सिंहि-णीच्या अर्ध्या वचनांत असतो. ती बसली कीं तो बसतो, उठली कीं उठतो, शिकारीला निघाली कीं तिच्यामागं जातो. तसं तुमच्या दोघांचं आहे. मंजूळ, मला करशील रामोशीण तुझ्याप्रमाणं ? होईन मी तुझ्या-सारखी ? म्हणजे शरदूला मी सिंहाप्रमाणं वागवीन.

मं०:—तुम्ही कां व्हनार नाय ! पण तुम्ही पडला शिरीमंत.

ली०:—मला श्रीमंतीचा पहिल्यापासून तिटकारा आहे. मी गाद्या-गिरद्या सोडून उघड्यावर झोपेन, रानांतून हिंडेन, जाडंभरडं खाईन, जाडंभरडं नेसेन तुझ्यासारखं.

मं०:—त्येनं काय व्हनार ? तूं सरकारजमा रावभादूराची लेक. तुला हें कसं जमेल ?

ली०:—तूं सांगशील तें करीन. अगदीं गळ्याशपथ.

मं०:—दे सबुद् ( हात पुढें करते. )

ली०:—( हातावर हात मारते ) सबूद.

मं०:—शरद् न् मी सरकारइरुधच्या गनिमी पथकांत दाखल झावूत. कैक गांवांनीं आपुला सबुद दिलाय देशाला. या कामांत आईबाप, बहिणभाऊ, मैतर यास्नी सोडावं लागतं.

ली०:—मी पण दिला माझा सबुद. मी फिरणार नाहीं. माझा सबुद फिरणार नाहीं. देशापुढें आईबापाला मानणार नाहीं.

मं०:—मग तुला रामोसीण कराया किती येळ ? शरद्‌बरोबर तूं हिंड देशाचीं कामं करीत. पुढं काय करायचं ते आम्ही सांगूं मागून. यल्लीआईनं दळण घातलं हाय. मी जातें तिच्या मदतीला. पण...

ली०:—माझा सबुद बदलायचा नाय. मला पण गांवाकडं गेलं पाहिजे आतां.

[ मंजूळ पडळींत व लीला गांवाकडं जातात. बाजा पडळींतून चरका घेऊन येतो व खाटेवर बसून चालवितो. पडळींतून मंजूळचं जात्यावरचं गाणं ऐकूं येतं. ]

गाणं:—ये हारि, रंग केशरी, गोपिला माऽरी ।
सावळा खेळे रावऽळीं यमुना तीऽरीं ।
रंग दिला दिला । हारि मोत्याचा गजरा त्याला ॥
शोभतो त्याऽला ॥
ये लाल, रंग गुलाल, गोपि बिनताल ।
अहा देवाशीं रंग खेळली । भिजली चिंब झाली ॥

( यल्ली भरलेली चिलीम हातांत घेऊन गाण्याच्या ठेक्यावर डुलत येते. बाज्याला चिलीम देते व जवळ उभी राहते. )

य०:—किती ग्वाड आहे पोरीचा गळा. किस्नाबाईच्या पुरावानी गानं पसरलंय शिवारांत!

बा०:—हुं.

य०:—नांदत्या लक्ष्मीवानी पावलं उमटतात तिचीं शेतांतून घरांत न् घरांतून शेतांत. आन् कामसूबी हाय. दिवसभर शाळू राखून पायलीचा बैरा घेतलाय सुपांत तिनं.

बा०:—हायिच ती गुनाची.

य०:—आन् इस्वास पाटील तरी किती थोर हायती दिलाचे! रामोशी, म्हार, मांग संमदं सारखं त्यांच्या म्होरं. लक्ष्मीनारायनावानी जोडा हाय. मंजूळचान् इस्वासचा.

बा०:—हुं.

य०:—कावं असं करतां? बरं नाय जिवाला? मघांपासून मी पगतें कामांत चित नाय. भाकरतुकडाबी खाल्ला नाय. असं काय करतां? ( चिलमीचा एकच झुरका मारून बाजा चिलीम परत तिच्या हातांत देतो.) चिलीम बी ग्वाड लागत नाय!

बा०:—व्हयनां! म्हून तर मंजूळचा चरका घेऊन बसलोंय. त्याच्यांतल्या जादूमुळं तरी माझं डोस्कं उतरूं दे. ( चरका फिरवतो. )

य०:—राहूं द्या. आपनास्नी काय साळ्याचे माग चालवायाचं हायती रात्रंदिवस चरका घेऊन?

बा०:—वटवट करूं नगस. जा घरांत नाय तर भाकऱ्या करपतील.

य०:—काय इंगळया लागल्यात त्या सांगाल कीं नाय?

( कुत्रें इवळून रडतें. )

बा०:—ऐक, दुस्चिन्ह हाय.

( गुंडा पडळींतून बाहेर पडतो व खाटेजवळ येतो व यल्ली-बाजाकडं आश्चर्यानं पाहत राहतो. )

य०:—हाड् हाड्. गप बस, नाय तर डोकं फोडून टाकीन दगडानं.

बा०:—त्याचा दोस नाय. त्याला म्होरं काय व्हनार तें दिसतं म्हून तें धन्याला सावध करतं. यल्ले, लहानपनापुन इकते दिस झालं, पन जोडीच्या चाकावानी वाटचाल केली. जिवाची गोस्ट एकमेकाला सांगितली नाय असं कंधी झालं नाय.

य०:—पन धरनाला तोंड फोडाल कीं नाय.

बा०:—काय सांगूं ? माझं डोस्कं फुटाया झालंय.

य०:—अवं पन झालं काय ?

बा०:—इस्वासाचं बिंग रावभाद्दुरानं जानलंय.

य०:—तरी मी म्हंगत व्हते कीं हें जळतं कोलित नाय पाहिजे आपल्या घरांत. आतां रावभादूर काय म्हंगतो ?

बा०:—तो म्हंगतो कीं खंडोबाच्या जत्रंत कांग्रेसची सबा हाय. तवा त्याला पकडून दे. नाय तर तुझीच खबर देतों पोलिसांत कीं हा खुनी फरारी हाय म्हून. मातुर अर्ज्यान् इस्वास एक हायित येवढी गोस्ट नाय म्हायित त्येला.

य०:—ऊं: ! यांत काय अवघाडलागतंय तुमास्नी. मल्हारिमार्तंड पावला नवसाला. त्येला म्हनावं आमाला पांच हजारांचा तोडा दे म्हंजी तुला सोन्याचं डोळं वाहूं. यसवंतरावबुवाला सोन्याचं पाय वाहूं आन् हेगडे-पाटलाला मुंडासं बांधूं.

बा०:—उजून तो पैसं घेनार हाय बक्षिसाचं. दोनसं रुपये तर बयाना दिला हाय. ह्या पघ शंभरशंभराच्या दोन नोटा.

य०:—तसाच हाय मातबर त्यो धनी.

बा०:—हळुं बोल. मंजूळ ऐकल. तिचं घिरट बंद झालं हाय.

य०:—( कानोसा घेऊन ) मघाशींच ती पेंगत व्हती. झोंपली असल

आतां जात्याजवळ. कारभारी, जा. धन्याला सांगा आम्ही काम करतों म्हून. गुंडाची करील मदत. आपलाच पोरगा हाय तो.

बा०:—( गुंडाकडे पाहृत ) माझा पोरगा हाय माझ्यावानी. त्यो बैमान होनार नाय. बाजा, तूं काय इचार धरला हैस मनामंदी ! थुःत् तुझ्या तोंडावर ! थूः थूः थूः !

य०:—कारभारी ! कारभारी !

गुं०:—इश्वासाचा घात ! लई बंगाळ काम ! आई, माझं शीर कापुन ठेवीन पन माझा सबुद खरा करीन. खराब करनार नाय.

बा०:—माझा सबुद, बाजाचा सबुद वायां जाईल ? नाय जानार. आपल्या सबुदाकरितां बाजा परान देईल.

य०:—अवं कसला सबुद घेऊन बसलाती.

बा०:—माझा सबुद. मी इस्वासाला दिलाय तो. देसाला दिलाय तो. माझा सबुद खरा करून दावल्याबिगार मी जगनार नाय.

य०:—मग पैसं कसं घेतलंत ?

बा०:—मी कुठं दिलाय त्याला सबुद ? बयाना मी खाऊन जाईन.

य०:—कुनाचा इस्वास न् कुनाचा देस. गुंडापरीस मला कोन अधिक नाय. मी तुमास्नी बजावतें या भानगडींत धोका हाय. गुंडा आपल्या बंसाचा कोंब हाय. तुम्हांला हें पटलं नाय तर दुसरं सांगतें. त्याला घेऊन आपुन कुठं तरी निघून जाऊं.

बा०:—माझ्या नाय थिरत डोक्षांत. शेतवाडी टाकून कुठं जानार आपुन ? आन् या महागाईत खानार काय थतं ?

य०:—माहित हाय मोठी सबुदाची किंमत हाय ती ! इस्वासला सबुद दिलात त्याचं अगुदर रावभादूराला बी सबुद दिला हाय कीं तुमच्या जिवाला जीव घेऊन् सांगाल तें काम फत्ते करूं म्हून. त्याच्या जिवावर धा वर्स त्याचं नमक खाल्लं. त्यानं आसरा दिला म्हून तर आपुन जगलों. त्याच्यासंगं नमकहराम व्हतां !

गुं०:—आई ! बाबा ! ( गुंडा बाजाचा हात धरून उभा राहतो. )

बा०:—यल्ले, यल्ले, माझ्या डोस्क्यानं पेट घेतलाय बघ. इकडून हरामीन् तकडून हरामी उभी करूनशान् तूं बाजाचा गळा दावीत हायिस.

य०:—आपुन रामोशी हावूत. आपल्याला पहिली हरामी नाय. दुसरी मातुर हाय. चला. रावभाद्‌दुराला बातमी देऊन या.

बा०:—अझून बाजाला भ्या म्हंजी काय माहीत नव्हतं. आतां त्याच्या अंगाचा लटका पडलाय. समदा काळोख, नदी–झाडंवावरं त्याला खायाला उठल्याती. बघ. त्यांतून माझ्या बापाचं, आजाचं भूत निघाल हाय. आन् ते इचारीत हाय रामोशाचा सबुद कुठं गेला ?

य०:—चला. वढ्यापर्यंत मी सोबत करीन. थतुन वस्ती हाय. ( यल्लां बाजाला घेऊन वावरांतून निघून जाते. )

गुं०:—बाबा, बाबा, त्या हलकट रावभाद्‌दुराकडं जाऊं नगान् देसाला दिलेला सबुद मोडूं नंगा. फितुरी बंगाळ हाय. आपल्या वंसांत फितुरी नाय. बाबा, मागं फिरा. बाबा, बाबा,......

( गुंडाचा ओरडा ऐकून मंजूळ घाबरून पडळीबाहेर येते. )

मं०:—गुंडा, काय झालं ?

गुं०:—काय सांगूं ? बाबा फितूर झाला.

मं०:—बाजा ! फितूर ! शक्य नाहीं.

गुं०:—तो स्वोता झाला नाय. पन त्येला होनं भाग पडलं. रावभाद्‌दूरला बाबाचं इंगित माहित हाय. त्या कात्रींत त्येनं बाबाला पकडला हाय अगदीं जाम. मंजूळ, बाबा न् आई रावभाद्‌दूराच्या बंगल्यावर तुमची बर्दी द्येया गेल्याती. ते परत यायच्या आंत तूंन् इस्वास कुठंतरी दुसऱ्या गुपित जागीं जाऊन राहा.

मं०:—पण पाटील कुठं आहेत ?

गुं०:—मघाशीं ते खंडोबाच्या घळींत गेले व्हते.

मं०:—जा. जा. त्यांना ताबडतोब इथं घेऊन ये. मी मळींत त्यांची बाट पाहते.

( गुंडा निघून जातो. एक शीळ ऐकूं येते. ती न ऐकतां मंजूळ आकाशांतील ताऱ्यांकडं पाहते व नमस्कार करते. विश्वास दोन सशस्त्र लोक घेऊन पुढं येतो.

वि०:—मंजूळ, बाजा कुठं आहे ? त्याचे लोक कुठं गेले ? कामगिरीची वेळ झाली तरी हे लोक सुस्त कसे ? खजिन्याची मोटार आतां जाईल रस्त्यानं. ( मंजूळ गप्प उभी राहते. यल्लीला चुकवून बाजा परत येतो व उसांत लपून राहतो. )

वि०:—बोलत कां नाहींस ? आणि उघड्यावर प्रार्थना कसली करीत होतीस ?

मं०:—परमेश्वराची. बाजाला, यल्लीला न् त्याच्यासारख्या हिंदुस्थानांतील असंख्य लोकांना सुबुद्धि देण्यासाठीं व त्यांच्या हृदयांत स्वातंत्र्याची उषा उजळविण्यासाठी मी परमेश्वराचा धांवा करीत होतें. कारण देशांतील सर्व जनतेच्या हृदयांत स्वातंत्र्याची उषा फांकली नाहीं तर नुसते मोठे पुढारी किंवा मोठीं माणसं निपजून कांहीं होणार नाहीं.

वि०:—काय केलं बाजानं ?

मं०:—बाजा फितूर झालाय. तुम्हांला कसं पकडून द्यायचं हें ठरविण्याकरितां तो आतांच रावबहादूरांच्या बंगल्यावर गेला आहे.

वि०:—पैशाकरतां फितुर झालाय !

मं०:—पैशाकरतान् जिवाकरतां पण. पैशापेक्षां जीव प्यारा आहे. पण पैशावांचून जीव जगत नाहीं. तो बंगल्यावरून यायचे आंत आपल्याला हें ठिकाण सोडलं पाहिजे.

वि०:—तरी मी तुला आधीं सांगत होतों कीं या लोकांचा नेम नाहीं म्हणून.

मं०:—देशभक्ति म्हणजे काय हें त्या अडाण्यांना कळलं नाहीं तर नवल नाहीं. सुशिक्षितांना हें समजतं पण कितीजण सामील झाले आहेत तुमच्या चळवळींत? परमेश्वर बाजाच्या हृदयांत पालट घडवील. तो थोडासा चुकला म्हणून रागवू नका. त्याला क्षमा करा. चला.

वि०:—चल. पण आधीं आंतलीं हत्यारं आण. वेष पण लष्करी पालटून ये. कारण आमच्या लोकांत मिसळून तुला जावं लागेल!

मं०:—तुम्ही पुढं व्हा. तुम्हाला धोका जास्त आहे. बाजा रावभाद्दुराकडून परत आल्यावर काय सांगतो तें मी मागं राहून आडून ऐकेन. आपल्याला त्यांचे बेत कळणं जरुर आहे.

त्रि०:—हें कोण येत आहे इकडून?

मं०:—खजिना तर नाहीं ना?

त्रि०:—खजिना मोटारनं जायचा आहे. (मंजूळ आंत जाते. जिरग्या येतो व डोली खालीं ठेवतो.)

जि०:—खजिनाच आहे हा. मनुष्याचे आईबाप म्हणजे खजिन्याहून जास्त मोलाचे ह्यायीत. जरा शेकोटी करा. म्हातारा लई थंडावलाय. (लोक शेकोटी करतात.)

वि०:—बळि पाटलांना आणलंस, केवढा घोटाळा केलास, जिरग्या! आम्ही आतांच खजिना लुटीच्या कामगिरीवर निघालों आहोंत. ती ऐक शीळ. (नदींतून शीळ येते.) तुला माहीत नाहीं कीं गालफ्यांत जीव धरून शिकारी कुत्र्यांना चुकवीत आम्हाला सारखं पळावं लागत.

जि०:—मी काय करनार? देवासारी मानसं हीं. ह्यांनीं पायावर डोई ठेवली आन् म्हंगालं माझ्या डोळ्यांत परान आल्याती, मला लेकाची भेट करीव. म्हून सतरा चौक्या चुकवीत आनलं.

वि०:—फार चांगलं केलंस! आतां यांची सोय कुठं लावूं? ऐक. (नदींतून पुन्हां शीळ येते.) माझे सवंगडी कसे अधीर झाले आहेत ते. दुखणाईत देशापेक्षां दुखणाईत बाप श्रेष्ठ नाहीं. माझे वडील मरायल

टेकले आहेत ते केव्हां तरी मरणारच. पण त्यांच्यामुळं माझ्या कार्यात विघ्न येऊन कितीतरी लोकांचे जीव धोक्यांत पडणार आहेत. जिरग्या, यांना जसं आणलंस तसं निंबगांवला परत पोंचवून टाक.

बळि०:—अरेरे, चांडाळा! मरतांना तुझी मांडी मिळावी म्हणून मी इथं आलोन् तूं म्हणतोस परत जा. अरे काळी विकून तुझं शिक्षण केलं त्याचे कां पांग फेडतोस? देशाच्या नांवाखालीं आईला खालीस, मला मरणाच्या दारीं बसवलंस. सोन्यासारख्या बायकोची धूळधाण उडवलीस, माझा वंश बुडवलास. आतां मला स्वर्गांत पाणी कोण पाजील!

वि०:—मी. ब्रिटिशसरकार फार दिवस मला तुमच्या मागं ठेवणार नाहीं. स्वर्गांत तुमच्या मागोमागच मला यावं लागणार आहे. तेव्हां पाण्याची तुम्हाला काळजी नको. कृष्णाकांठचे शेतकरी बंधु अश्रूंची श्रद्धांजलि वाहतील ती पिऊन आपण राहूं.

ब०:—मरणाच्या दारांत तुला चेष्टा कशी सुचते? त्यापेक्षां देवानं मला निपुत्रिक कां केलं नाहीं!

वि०:—बाबा, मी पितृभक्त नाहीं असं का तुम्ही समजतां? मी तुमच्याकरितां काय करूं सांगा.

ब०:—करशील? आतांपर्यंत माझ्या विसूनं कधीं मोडली आहे माझी आज्ञा! विसू, प्रांतसाहेबांनीं मला रहदारी बंगल्यावर बोलवून घेतलंन् ते म्हणाले म्हाताऱ्या, मी तुझ्या पांढऱ्या केसांची कदर करतोन् तुझ्या पोराचे सर्व गुन्हे माफ करतों. एवढंच नाहीं तर त्याला मामलेदाराची नोकरी देतों. पण त्यानं चळवळींत पडणार नाहीं असं लिहून दिलं पाहिजे.

वि०:—बाबा, मी देशाला सबुद दिला आहे. माझा सबुद मी कल्पांतीं फिरवणार नाहीं. देशाचा द्रोह सोडून मला वाटेल तें सांगा.

(यल्ली येते.)

य०:—कोण आलंय?

गि०:—बाळि पाटील.

य०:—या, बळि पाटील. बरं झालं तुम्ही आलांत. तुमच्या मुलानं माझा गुंडान् कारभारी नादीं लावलेत, आन् माझ्या संसाराचा इस्कोट केलाय. तुम्ही मला वांचवा. तुम्ही इथं रहा. मी तुमची सेवा करीनं.

( मंजूळ येते. ती व विश्वास एकमेकांकडं पाहतात. )

वि०:—यल्ली आई, बाबांना नीट जप. आम्ही कामगिरी करून लगेच येतों.

मं०:—मामंजी, तुमची सून तुम्हाला नमस्कार करत्ये.

ब०:—कोण ? मंजूळ ! तूं या दरोडखोरांत येऊन राहिलीस ? अब्रूच्या भीतीनं तर मी तुला माहेरीं पाठविली होती.

मं०:—त्या वेळीं मला कोणी पाठीराखं नव्हतं. आतां हा आहे !

ब०:—हा लष्करी शिपाई तुझी अब्रू वांचवणार ?

वि०:—मंजूळनंच लष्करी पोषाख केलाय बाबा. ती तुम्हाला रिव्हाल्व्हर दाखवीत आहें.

ब०:—ती तुझ्याबरोबर दरोडे घालणार ? चांगलं आहे. विश्वास, तूं बिघडलास न् पोरीला पण बिघडवलीस !

( दोघेहि जातात. )

य०:—जिरग्या, बळिपाटलास्नी आंत ने.

( जिरग्या बळि पाटलाला उचलून पडळींत नेतो. यल्ली बाजाच्या वाटेकडं डोळे लावून उत्सुकतेनं पाहते. )

य०:—आलं जनुं कारभारी. ( एका बाजूनें बाजा हातांनीं तोंड झांकून येतो. विरुद्ध बाजूनें मंजूळ येते. ती आंब्याच्यामागं लपते. )

बा०:—आतां जगाला हें तोंड कसं दावूं !

य०:—पैका असल्यावर जगाची जरूरीच काय मुळीं ? मी मग जगाच्या तोंडावर थुंकेन. आना हकड बयाना. ठेवून देते पेटींत. ( बाजा खिशांतून नोटा काढतो व दांत खाऊन चुरगाळतो. )

बा०:—नाय. मी बैमान होनार नाय. यल्ले, यल्ले, तूं मला काय घोरांत घातलंस ? मला आतां कायबी सुचत नाय. माझा सबुद ! माझा सबुद ! पापी-रावभाद्‌दूरला माझा सबुद दिला तर देशाचं वाटोळं व्हईल; आन् तो देसाला दिला तर गरीबांच राज्य व्हईल. आन् मानसापेक्षां देशाला दिलेला सबुद मोठा हाय. ( डोकं धरून बसतो. )

य०:—ते कायबी आनुं नगा मनांत. ते लोक खजिना लुटाया गेल्याती; आतां येतील.

बा०:—गप्प बस. माझा सबुद मी देसाला दिला हाय. चाळीस कोटि रावभाद्‌दूरापरीस माझा देस मोठा हाय आन् त्यापरीस माझा सबुद मोठा हाय. मागं नाय घेनार मी माझा सबुद. यल्ले, नीट ऐक. मांजराच्या पिलाचे डोळं सातव्या दिवशीं उघडतात. कुत्र्याच्या पिलाचं एकविसाव्या दिवशीं आन् मानसाचं तो मेला तरी उघडत नाहींत. पन माझं डोळं उघडलं.

य०:—आतां कसं बोललांत. रावभाद्‌दूरानं अंजन घातलं म्हून उघडलं.

बा०:—रावभाद्‌दुरानं नाय. बळ्यांतून तुला चुकवून मी परत फिरलोन् उसाच्या फडांत आलों. तथून इस्वासाचं न् बळी पाटलाचं भाषण आडून ऐकलं. तवा माझं डोळं आपोआप उघडलं. इस्वासाला देसाम्होरं आई-बाप, बायको, पैका कायबी नाय. तें ऐकून मी शरमेनं मेलों.

य०:—मी आतांच जाऊन समदं रावभाद्‌दुराच्या कानावर घालतें. म्हंजी तेच कान उघडतील. ( रावबहाद्‌दुराकडं जाण्यास निघते. )

बा०:—यल्ले, मागं फीर. मी रामोशी हाय. तूं रामोशाचा कायदा जानतेस. ऐक. गुंडा तुझा पोरगान् इस्वास माझा. ( पटक्यांतून कुऱ्हाड काढतो. ) तूं माझ्या पोराच्या वाटेस गेलीस तर या कुऱ्हाडीनं तुझ्या पोराचा खांडा करीन. जा घरांत. या पैक्यानं मला. भूल पाडली. जय मल्हार. ( बाजा नोटा आगटींत टाकतो. यल्ली त्या प्रकाराकडं डोळे बाहेर पडल्याप्रमाणं पाहते. )

---

# अंक ३ रा

( बाजा खिन्न होऊन खाटेवर बसला आहे. गुंडा न् यल्ली बावरांतील शाळू उपटीत आहेत. गुंडा न् यल्ली शाळूचीं ताटं घेऊन येतात व रचतात. पुन्हां जातात. )

बा०:—गुडा, सांजावलं तरी मेहनतीला जावा नाय ! यंदा कुस्तींचा फड घालवनार फुकट !

गुं०:—कुठं ईरलीच दावायाची नाय. मग तांबड्या मातींत नागावानी फुस्स फुस्स करून काय व्हनार ? बाबा, मंजूळलाम् इस्वास पाटलाला घालवून तूं आमची गंमत मारलीस. बघ, शाळू निंदलेल्या बाबरावानी मन उदास झालंय माझं. मरणकळा आल्यावानी दिसतंय शेत.

बा०:—हें तुझ्या आयशींचं काम हाय.

य०:—( प्रवेशून ) तुम्ही पैक्याकरितां न् सबुदाकरितां मागं फिरलांत न् मला दोस देतां ? तुमचा येवढा कालिजा हाय फरारी तर त्याला बोलवून घ्या परत.

बा०:—तो आतां आपुल्या सबुदावर इस्वास ठेवील !

गुं०:—मला नाय करमत हतं. आतां मी ममईला जानार गोदींत हमाली कराया. समदं गांवकरी मला पधून कुचकुचतात न् दांत खातात माझ्यावर. ( जातो. )

य०:—मग आमचा काय निवेद बाढून ठेवलाय हयं. आपुन समदीच जाऊं. ( जाते. )

( बाजा तोंडावर हात ठेवून बसतो. मंजूळ येते. )

मं०:—बाजाबाबा, मामंजीचं कसं आहे !

बा०:—आल्यापरीस जास्तच बिमार हायती; अगदीं डोस्कं असं

उचलींत नाहींत. पन पोरी, तूं ह्यथून जा आन् पुना ह्यथं येऊं नगस. नाय तर तुला बाजाचं काळं तोंड दिसेल. तुझ्या मामंजीची काळजी मी तुझ्या-वानी घेईन. जा. जा.

मं०:—बाजाबाबा, मनाला असं लावून घेऊं नका. रावबहाद्दुरानं कात्रींत पकडलं तुम्हाला म्हणून निरुपायानं तुम्ही फितूर झालांत.

बा०:—पोरी, नवथर हायीस तूं. तुला कायबी समजत नाय. गेला, कांचेला तडा गेला.

मं०:—नाहीं गेला. तुमच्या काळजाला चीर गेलीय. मी पाहिली आहे ती. तुम्ही सबुदाकरितां फितुरी कबूल केली. याला धैर्य लागतं. तुम्ही रावबहाद्दुरांच्या बंगल्यावर गेलांत त्या वेळीं पाटील आले न् मग आम्हीं हें ठिकाण सोडलं; पण तुम्ही पुढ काय करतां हें पाहण्याकरितां मी परत आलें व पुन्हा तुमच भाषण आडो-शाला उभी राहून ऐकलं. सबुदाकरितां तुम्ही स्वतःच्या पोराचा खून करा-यला निघालांत. धन्य आहे तुमच्या दानतीची. देशापेक्षां सबुद मोठा आहे हें तुमचं सुभाषित गांधींना देखील चकित करील.

बा०:—नाय. पोरी, बाजा बेमान नाय. इस्वासानं मला सोडलं तरी मी त्याला सोडनार नाय. एक दिवस मी त्याला कर्तुक करून दावीन. जय मल्हार. जय हिंद. पोरी, त्याचं पाय पडळीला लागल्याबिगार मन शांत व्हनार नाय माझं.

मं०:—ते तापट स्वभावाचे आहेत. पण अगदीं भोळे सांब. आजच्या सभेला ते इथं येणार आहेत. त्या वेळेस मी त्यांना समजावून पडळींत आणीन. ( गुंडा येतो. )

बा०:—गुंडा, गुंडा, माझं पाप फिटलं. तोंड उजळं झालं. इस्वास ह्यथं सवंला येनार. त्याचं पाय आपल्या पडळीला लागनार.

गुं०:—नगा. नगा, मंजूळ ताई, पाटलांना ह्यथं आनूं नगा. पोलिस कडक पाहरा ठेवनार हायित.

मं०:—छे: छे: ! सभेंत त्यांचं भाषण झालं नाहीं तर लोक खट्टू होतील. कांहीं तरी युक्ति करून पोलिसांचं नाक ठेचलं पाहिजे.

(शरद् गळ्यांत शिंप्याची टेप अडकावून आरशांत पाहत, दाभाडाचीं झाडं चेपीत गर्दन दाबीत येतो. मंजूळ सगळ्यांना थाळूंत लपायाला सांगते. शरद् दंड, गर्दन, छाति, मांड्या यांचीं मापं घेतो न् नोटबुकांत टिपतो. मग आंब्याच्या झाडाला रग्गे मारण्याची सुरवात करतो. तें पाहून मंजूळ पुढं येते.)

मं०:—ए माझ्या रामोशा !

श०:—तुझा रामोशी ! मी !

मं०:—होय. मी रामोशीण म्हणून माझा नवरा रामोशी, अन् तूं माझा भाई म्हणून रामोशी न् मला पोरगा होईल तो पण रामोशी. पण तूं हें चालवलेंस काय ?

श०:—दगडाप्रमाणं अंग टणक करीत आहे. बघ दंड किती टणक झाले आहेत.

मं०:—(शरद्चे दंड दाबून) खरंच. पण नोटबुकांत काय टिपीत होतास ?

श०:—तयारीचीं मापं. तुझ्या रामोशानं जोर, जोडी, बैठका, कुस्ती यांनीं माझ्या अंगाचा खुर्दा उडवून दिला नुसता आन् वर अंडीं, कोंबडी, सूप, निरसं दूध, हुरडान् मक्याचीं कणसं यांचा खुराक सुरू केला. मग तयारीला किती वेळ लागेल !

मं०:—आतां मात्र खरा रामोशी झालास.

श०:—मंजूळ, तूं माझी गुरु. माझा देह आणि मन यांत तूं क्रांति केलीस. अशी क्रांति प्रत्येकांत झाल्याशिवाय खरी क्रांति होणार नाहीं. माझ्याप्रमाणं लीलाला पण अनुभव आला आहे. वावरांतून, नदीकांठानं, मळींतून मस्त होऊन हिंडतांना असा काय आनंद होतो हल्लीं कीं

कोत्यविशाला पण तो मिळणार नाहीं. अशी काय रग अंगांत आली आहे कीं पाय आपोआप ताठ पडतात, छाति पुढं येते, इनुवटि आंत जाते, गर्दन फुगते, रक्त वाढल्यामुळं डोकं चालतं आणि नजर स्वच्छ होऊन लांबचं दिसूं लागलंय. मंजूळ, मुठी घट्ट पकडून कश्याला तरी धडका द्याव्यात, अचाट कामं करावींत असे विचार थैमान घालतात माझ्या डोक्यांत.

मं०:—अचाट कामांना काय तोटा! करशील तेवढीं थोडीं आहेत. बघ, एक धाडस आयतंच चालून आलं आहे. पण फसलं तर कैद होशील.

श०:—कबूल. कबूल. पाटलांनीं मला शपथ दिली आहे तुमची. आतां माझे प्राण तुमचेच आहेत.

मं०:—हें बघ, आजच्या सभेंत पाटील बोलणार होते. पण पोलिसांचा बंदोबस्त फार आहे. कदाचित् ते पकडले जातील. ते सभेंत बोलले नाहींत तर सभा फुकट जाईल, लोक नाराज होतील न् पोलिसांची जित होईल.

श०:—मग मी काय करूं!

मं०:—आंत चल. म्हणजे सगळं सांगतें. (त्याला आंत नेते. इतक्यांत पडद्यांत गलबला होतो. 'कुठं आहे तो बाजा?' 'धरा त्याला.' 'ठोका.' 'हाना.' 'मारा' असं ओरडत खाशा वगैरे गांवकरी येतात. त्यांचे हातांत काठ्याकुऱ्हाडी असतात.)

खा०:—बाजा, हरामखोरा, तूं आमचा इस्वासघात केलास. तूं फितूर झालास. (बाजा मान खालीं घालतो.)

स०:—तूं हेर हायिस सरकारचा.

बाळ्या:—तूं रावभाद्दुराचा बगलबच्चा हायिस. तूं पोलिसांना सामिल हायिस.

खा०:—तूं आमच्या इस्वासला न् मंजूळला इतून घालवलंस. त्यांनीं आम्हाला मानूस बनवलं. कसं बोलावं, कसं रहावं, कसं जगावं, कसं मर्द व्हावं, ह्यो शिकवलं. आमच्यांत एकी केली, समदीं भांडणं मिटिवलीं;

समद्यांचा एक सबुद केला आन् तूं खंडीच्या दुधांत मिठाचा खडा टाकून नासवलंस. तोडून टाकतों तुला.

ठ०:—बोलत कां नाहींस ?

बा०:—काय बोलनार ? मी आपलं डोस्कं तुमच्या म्होरं केलं हाय. घाला कुऱ्हाड डोसक्यांत. ( मंजूळ पडळींतून बाहेर पडते व बाजा वगैरे जवळ येते. )

मं०:—ज्या डोक्यांत ती घालायाची आहे तें पुढं येईपर्यंत तुम्ही आपलं डोकं ठिकाणावर ठेवा.

खा०:—आमचा मानुस आम्हाला फितुर व्हतो ! नायं व्हत आम्हाला हें सहन. आम्ही त्याला शिक्षा करनार.

मं०:—तुम्ही इतकेजण गर्दी करून आलांत तर बाजासारखा म्हातारा तुमच्यासमोर टिकणार नाहीं. परंतु तुम्ही गरीबाचे काळ होऊन श्रीमंतांचा प्रतिपाळ करूं नका.

खा०:—मेलों तरी हरकत नाहीं. आम्ही टोपीवाल्यांनाबी मारून काढूं.

मं०:—इंग्रजी प्रजेशीं आमचं वाकडं नाहीं. ती देखील आमच्याच-सारखी दुर्बळ आहेन् मूठभर श्रीमंत इंग्रजांच्या हातांत आहे. भांडवल-शाहीचा राक्षस काळागोरा हा भेद करीत नाहीं.

बाब्या:—म्हनून आम्ही बाजाला सोडूं ? त्यानं दिलेला सबुद मोडला.

मं०:—बाजाचं दिल तुम्हाला माहीत नाय. सबुदाचा खरा अर्थ तोच जाणतो. तो सबुद मोडणं शक्य नाहीं.

स०:—त्यानं तर आमच्यांत न् आमच्या इस्वासांत दुरावा केला.

मं०:—आज इथं सभा होईल त्यांत पाटलांना तोच आणणार आहे.

सर्व:—खरं !

मं०—अगदीं खरं. आतां सभा भरेल. तुम्ही बसून जा. ( सर्वजण बसतात. लोक येतात. लेजिमढोल येतो. एकजण झेंडा रोवतो. गुंडाशेजारीं वेषांतरांतला माने येऊन बसतो. पलीकडं लीला व रावबहाद्दूर असतात. )

मा०:—(शेजारच्या खेडुतास) आजच्या सबंला नाना पाटील यायचे हायती जनु ?

खे०:—कशावरनं म्हंगतां ?

मा०:—लेजिमन् ढोल आलाय ना !

खे०:—तें नाय माहीत; पन इस्वास पाटील येनार हायती. तो आला कीं त्याला सलामी व्हईल ढोलाचीन् लेजमाची.

मा०:—अस्सं व्हय ? (एक म्हातारा खेडूत तिथं येतो.)

म्हातारा—पन इकता गडद पडलाय तरी येत कसा नाय ? आतां कसन्चा येतो तो !

खे०:—येईल. येईल. वाइच कळ काढा कीं. आल्याबिगार राह्यचा नाहीं तो.

म्हा०:—रात झाली. आतां नाय येनार तो. मी आतां चाललों.

लोकः—खालीं बसा. पाटील, खालीं बसा.

म्हा०:—गडाद पडल्यावर मला पायाखालचं दिसनार नाय. उजून मी हाय दोन बायकांचा दादला. माझं दुख मला माहीत. तुम्हाला सांगून काय उपेग ! टवळ्यांनीं घर घेतलं असल डोस्क्यावर. (सर्वजण हंसतात.)

गुं०:—इक्त्या म्हातारपनीं दोन बायका केल्या कशापायीं ?

म्हा०:—कशापायीं ! शेतकीच्चीं कामं हायती ना आपल्यामागं. म्हटलं जेवनावरी गडी व्हईल घरचा. (सर्व हंसतात.) चला. तुम्हीं तरी कशाला बसतां ? तुमची पन येळ झाली असल.

खे०:—नगा जाऊं. बसा खालीं. नाना पाटील न्हाई तर इस्वास पाटील येतलि, कुनी तरी येईलन् सबा चालू करतील. नायतर तुमीच व्हा आमचं इस्वास पाटीलन् सांगा आम्हास्नी चार गोस्टी.

म्हा०:—तुमचा आग्रव हाय तर सांगतों. पन बायकोची शपथ घ्या कीं ऐकूं म्हून. (सर्वजण हंसतात.) मंडळी हो, मी हाय आडमुठा

शेतकरी. कांद्यासंगं भाकर न् भाकरीसंगं झुनका कसा खावा येवढं म्हाहित हाय मला. आतां सांगा माझ्या हातांत हें काय हाय ?

लो०:—बांबूची काठी.

म्हा०:—आन ह्यो काय लावलंय तिला !

लो०:—पटकूर.

म्हा०:—मला आचीर्य वाटतं, येवढं मोठं इंग्रज सरकार या पटकुरास्नी भ्येतं कसं ? आन् तें हिसकावून आनाया पोलिसची संगीन पार्टी पाठवतं कशाला ? इकतं भेकड कसं झालं हाय तें ? आन् तुम्हींबी त्येंच्या परीस ! ह्यो पटकुर घरावर लावायास्नी भ्येता ! ससास्नी सात काळजं असतात. ती एकदम कापाया लागतात. म्हून तो संदांकंदां भेदरल्यावानी नाक उडवीत ऱ्हातो फुसफुस करीत. तशी गत हाय तुमची.

ली०:—म्हातारा दिसतो अनाडी पन बोलतोय कसा वर्मी.

रा. ब०:—गप बस.

मा०:—( गुंडाला ) आरं पन, मघापुन पघतुया. चिमटं कशापायीं घेतुसं ?

गुं०:—मी कंधी घेतलं. नाय बा. ( इकडं तिकडं पाहतो. )

म्हा०:—अवं झालं काय ?

मा०:—काय नाय. तुम्ही आपलं बोलत ऱ्हा.

म्हा०:—ह्यो पघा. ससाला सात काळजं असतात न् मानसाला योकच.

मा०:—काय मानुस हाय ! पुना आपलं त्येच. ( माने पुढं व गुंडा बाजूला सरतात. )

म्हा०:—काय वटवट चालवलीय सवंत. इळभर गप बसा कीं. मानसाला योकच काळीज असतं. चोराचं उलटं असतं पन मर्दाला काळिजच्च नसत. मग ते कशाला जात कापाया. तें त्येनं शिळ्या भाकरीसंगं कवाच्च खाल्लंलं असतं भाजून. तवा माझं सांगनं हाय कीं, तुमी भेकड बनूं नका. मर्द व्हा.

लो०:—आम्ही मर्द हावूत. आमाला काळीज नाय. आम्ही कुनाला भिनार नाय.

मा०:—(गुंडाला) उजून आलास माझ्या मागं चिमटं घ्याया. बघ इकडं आलास तर.

म्हा०:—आतां डोस्की आपटीन तुमचीं एकमेकांवर. मंडळी हो, दुसरी गोस्ट तुमास्नी सांगतों. तुमी इंग्रजाला मा-बाप म्हंगतां. तो तुमास्नी भरवतो. तवा तुमी जेवतां. तो तुमास्नी कांबरुणं देतो तवा तुमी तीं नेसतां. नाय तर नांगटं व्हायाची बारी आली असती तुमावर. तो तुमास्नी औसध देतो, मोटारी आगिनगाड्यांतून हिंडवतो. तुमचा समदा परतिपाळ करतो. म्हून तुम्हीं जगता. मर्द हो, फक्रास्त तुमच्या बायका घेमच्या व्हायल्याती त्येस्नी सांभाळाया. तेवढं केलं म्हंजी समदा तरास चुकंल तुमचा.

मा०:—कुनाचं कारटं हाय हे! येडबिड लागलंय यास्नी चिमटं घ्याया! आतां मातुर मुस्काट घडीन हां.

लो०:—हो. हो. सबुर. सबुर.

म्हा०:—तुम्ही म्हंगाल तुम्हास्नी मर्द कोन करील! महात्मा गांधी. त्येस्नी मीं ममईला चौपाटीवर पघितलं व्हत. मुंगीसारीं मानसं जमलीं व्हतीं त्येचा सबुद ऐकाया. शरीर म्हंगाल त्येचं तर हातांतली काठी जाड. जसा काय जीव हाय कीं नाय. कवाच मरुन गेलाय जनु. पन त्यो गांधी देसाकरतां उपास करून मेला. त्येला कोन मारील! सोराज्य मिळत नाय म्हून शरमंनं मरून गेलाय तो. त्येला कोन मारील! तुम्हांसारं मुर्दं पघून मरून गेलाय. त्येला कोन मारील! सरकारला तो मेल्यावानी दिसतोय पन सोराज्य मिळाल्याबिगर कंधीच मरनार नाय तो. तवा मी बजावतो तुमास्नी कीं तुम्ही गरीब त्येला तुमचा सबुद द्या. कारन गरीबांचं राज्य करीन देसांत म्हून त्येनं देसाला सबुद दिलाय.

मं०:—शाबास, म्हातारबुवा.

मा०:—ओय ओय ओय. केव्हढ्यानं चिमटा घेतलास दुबऱ्या जागेवर.

हलकटा, आतां नाय मी गय करणार. ( गुंडाच्या मुस्कटांत देतो. गुंडाची त्याची झटापट होते. सभेंत ओरडा होतो. )

म्हा०:—आतां येळ लई झालायन् लट्ठालट्ठीबी सुरू झालीय सबंत. तवा मंडळी, रामराम. मी हाय दोन बायकांचा दादला. इडळी केस नाय ठेवायच्या डोस्क्यावर रात केली तर. ( जातो. )

मा०:—हरामखोरा, मी माने फौजदार आहें. माझा बाप...

लो०:—अरे बापरे ! माने फौजदार...( पळून जातात. )

मा०:—( गुंडाचा गळा पकडून ) बोल. माझी चेष्टा कां करीत होतास ? ( बाजा प्रवेश करतो. )

रा. ब०:—फौजदारसाहेब, जाऊं द्या, तो आपला माणूस आहे.

गुं०:—तुमींच तर सांगितलं व्हतंत ना ?

मा०:—मीं काय सांगितलं होतं ? माझी चेष्टा कर ? नाकाच्या दुबऱ्या जागीं चिमटे घे ?

बा०:—फरारीला दाव म्हून तुम्हींच सांगितलं व्हतं ना ?

मा०:—पण फरारी कधीं आला होता ?

गुं०:—हात तुझ्या. आन् म्हाताऱ्याचं सोंग घेऊन बोलत व्हता तो कोन ?

रा. ब०:—विश्वास पाटील होता तो ? मग साहेबांना कां नाहीं सांगितलं ?

गुं०:—सारखा तर खुना करीत व्हतों चिमटं घेऊन.

मा०:—भल्या गृहस्था, चिमटे घेण्याऐवजीं तोंडानं बोलतास तर ?

बा०:—बा: साहेब ! आम्ही मोठयानं बोलावं आन् फरारीच्या हेरांनीं तें ऐकावं. म्हंजी फरारीनं आमचीं घरंदारं जाळून आम्हाला गोळ्या घालाव्यात. चांगलं बक्षिस देनार हायती तुम्ही !

मा०:—चूक झाली खरी. लेजिमांच्या हुलीनं मी फसलों. आतां काय करूं ? ( डोकं खाजवतो. )

बा०:—डोस्कंबाज हाय खरा फरारी.

मा०:—बोडक्याचा आहे डोस्केबाज. (डोकं पुन्हा खाजवतो.) लोकांची त्याला मदत आहे म्हणून ही नाटकं चालतात.

बा०:—आन् इकतं दिवस मी काय सांगत व्हतों ? ह्येंच. एकदां का लोक बिथरलं कीं कुनाचं चालायचं नाय त्येंच्या म्होरं. नाना कळी नाचवतील ते.

मा०:—मी माने फौजदार आहें. फरारीला अस्सा ठोकरत आणीन. (लाथ झाडतो.) ओय. ओय. ओय.

मं०:—कराम आनतां. लोक तर म्हंगत्यात ह्या नारू फौजदार शेंदाड-शिपाई हाय अगदीं.

मा०:—मी माने फौजदार, शेंदाडशिपाई ! दाखवूं का तुला !

मं०:—मला काय दावतां ? त्या फरारीला दावा कीं.

रा. ब०:—ए कोल्हाटणी, फारशी लांब जीभ करून बोलतेस !

मा०:—बांध पाहूं घुंगुर. आतांच उभा करतों तुझा तमाशा.

मं०:—मस्त पाहिलेत तमासं करनार. आधीं तुमचा होऊं द्या. मंग माझा व्हईल.

रा. ब०:—अस्सं होय ? मी पण मस्त पाहिल्यात कोल्हाटणी.

मं०:—पन मी त्यांतली नाय.

रा. ब०:—त्यांतली नाहींस ! किती किती घेशील दौलतजादा !

मं०:—त्याचं पातळ पोलकं आना लीलाताईना.

मा०:—दीड दमडीची कोल्हाटीण आणि नखरा किती करते !

ली०:—बाबा, बस्स झालं. घरीं चला.

रा. ब०:—लीले, घरीं जा. चालायाला लाग. तुझ्यासारख्या मुलीनं असल्या गोष्टी पाहूं नयेत. जा. जा. (लीला जाते.) मानेसाहेब, हं हं हं.

मा०:—रावबहाद्दूर, काळजी करूं नका. मी माने फौजदार आहें.

अशा कैक छटाक्यान् गुलाब्या...( तिला धरायला जातो. मंजूळ मागं सरते. )

मं०:—खबरदार.

दिवटीवालेः—( दिवट्या टाकून ) मानेसाहेब, साप. रावबहाद्दूर, साप.

गुं०:—कुठं हाय. ( साप शोधतो. मशाली विझतात. अंधार गुडुप होतो. )

मा०:—गुंडा, जाऊं नकोस. ती पट्टा फडा काढली त्यानं. अस्सल नाग आहे दहाचा आंकडेवाला.

रा. ब०:—फों करतोय कीं !

गुं०:—बाबा, बत्ति आन.

अंधारांतले आवाजः—मी नारू फौजदार हाय. ( काठ्यांचे आवाज येतात. माने ओय, ओय, करून ओरडतो. ) माझा बाप जमादार होता. ( ठोक. ) माझा आजा शिपाई व्हता. मी इनसपेक्टार व्हनार. ( ठोक. ) डी. एस्. पी. व्हनार. ( ठोक. ) आन् मी रावभाद्दूर हाय. ( ठोक. ) सरकारचा बगलबच्चा हाय. ( ठोक. )

( बाजा कंदील घेऊन येतो. मंजूळ व लोक तिथून गेलेले असतात. )

गुं०:—हात तुझ्या. ह्योतर केळीचं सोपट हाय. ( उचलून दाखवतो. )

मा०:—महाशब्दे गुरुजी, हें तुमचं कारस्थान आहे. तुम्ही कुठं तरी दडी मारून बसलांत आन् तेथून ही यमपुरी नाचवितां काय ? आतां तुमचा काटाच काढून टाकतों.

रा. ब०:—माझ्या इनाम हद्दींत मला मार ! त्यांना दाखवलंच पाहिजे. आन् त्या कोल्हाटणीला पण नाचवली पाहिजे एक रात्र तरी. बाजा, कोल्हाटीण तुझ्या पडळींत राहते न ?

बा०:—ह्वात व्हती. आठ दिस झालं म्या काढून लावली. तिचा साजिंदा फार भयंकर हाय.

मा०:—असूं दे. मी सहावारी अडकावीन कंबरेला अन् मग बसेन तमाशाला. आजच्यासारखा गाफिल राहणार नाहीं.

रा. ब०:—बाजा, तुझे लोक तयार आहेत?

बा०:—व्हय सरकार.

रा. ब०:—चल मग माझ्याबरोबर कंदील घेऊन. वाटेंत आपण महाशब्याचा कांटा कसा काढायचा तें ठरवू. (जातात. गुंडा हंसत प्रवेश करतो.)

गुं०:—हाः हाः हाः ! पाचुंदाभर मिशा हायती पन सोपटाला नाग म्हंगतो न् भ्येतो. हाः हाः हाः ! याला फौजदार केला कुनी? हाः हाः हाः ! आन् या दुसऱ्यालाबी सरकारनं रावभादूर केला कशापायीं? हाः हाः हाः ! (लीला, शरद्, मंजूळ प्रवेश करतात.)

श०:—अरे हो. हां. हंसून पोट फुटेल.

गुं०:—माझं पोट फुटलं तर तुमास्नी जाब द्यावा लागेल. दोन बायकांच्या दादल्याची नकल करून फौजदारास्नी बदडलात आन् आतां म्हंगतां हंसूं नगा.

ली०:—शरद् आला होता म्हाताऱ्या शेतकऱ्याचं सोंग घेऊन?

गुं०:—मंग काय? निम्मं रट्टं तर त्येन्नींच मारलं.

ली०:—मंजूळ, चांगला तयार केला आहेस माझ्या रामोशाला. त्याचं भाषण ऐकून माझ्या अंगावर कांटा सरसरला. मला आश्चर्य वाटलं कीं येवढे कसे गेले आहेत पुढें आपले खेडूत. मंजूळ, मला तरी कांहीं कामगिरी सांग. तूं विश्वास पाटलांची सहधर्मचारिणी आहेस हें कळल्यापासून मला साहसाचा ध्यास लागला आहे. देशाकरतां कांहीं तरी अचाट करावं तुझ्यासारखं असं वाटतं आहे मला.

मं०:—सबुद?

ली०:—सबुद.

मं०:—बापाला बाप म्हणतां येणार नाहीं अशी कामगिरी आहे.

ली०---मघांची बाबांची ओंगळ कृति पाहून मला त्यांचा तिटकाराच आला आहे.

मं०:—मग मला तुला तीच कामगिरी सांगावयाची आहे. माने आणि तुझा बाप मला भेटले कीं नेहमीं डोळे घालून तमाशा कधीं करणार म्हणून विचारतात. आज तर त्यांनीं कमालच केली. मला त्यांना तमाशा म्हणजे काय तें दाखवावयाचें आहे.

ली०:—माझा बाप झाला म्हणून काय झालं? अनीतीनं पैसे मिळवावयाचे, देशद्रोह करावयाचा, अन् त्या जोरावर लोकांच्या बायकांची अब्रू लुटायची. त्यांना शिक्षा ही पाहिजेच.

बा०:—(प्रवेश करून) फौजदारन् रावभाद्दूर यांनीं महासबुदाला शिक्षा करायचं ठरवलंय. त्येचं खलबत आम्ही करीत व्हतों. आतां काय करावं? ते म्हंगतात गांवांतल्या सगळ्या कळी महासबुद नाचवतो. आन् तो तर बिचारा घळीची हवा खात हाय.

य०:—(प्रवेश करून) कारबारी, तकडं तुमी सबंत आरड करून मजा करीत व्हता आन् हकडं मला वनवास पाठवला. एका म्हाताऱ्या-ऐवजीं तुमच्या इस्वासनं दुसरा पाठवला माझ्या डोस्क्यावर. आतां हा महासबुद मेला तर मी काय करूं?

मं०:—काय झालं?

य०:—काय झालं? तुमींच त्येला कोंडून ठेवला तवा त्येनं सुरू केला उपास. आठ दिस आनपानी घेतल नाय. तवा इस्वासनं त्येला सोडून दिला न् खाशाच्या पाटकुळीं देऊन खालीं पाठवला. तर बावरांत क्येलं त्येनं डोळं पांढरं. मग आनला पडळींत उचलून.

बा०:—मग त्येला दुधाचा घोट पाजलास कीं नाय?

य०:—अब मुसुंबीच्या रसाबिगार उपास सोडाया राजी नाय तो. आन् त्ये तर कुठं मिळत नाय. रावभाद्दुराच्या बागंत जांबूरीवर एक ईडनिंबू मिळालं. पन तो येडबंबू ईडनिंबूचं नांव काढूं देत नाय.

मं०:—अगं त्याचाच रस काढन् घाल त्यांत थोडी साखर. म्हणजे

त्याला ओळखूं येणार नाहीं. फायदेशीर तें सत्य, हें बुद्धाचं पथ्य आहे मानवतेला. ( महाशब्दे पडद्यांतून काठी टेकीत बाहेर पडतात. )

य०:—अगोबाई, हा कुठं चालला तकडं झोकांड्या खात !

मं०:—अहो महाशब्दे, अहो महाशब्दे, तिकडं जाऊं नका. तिकडं खाबरन् कृष्णामाईचा डोह आहे. त्यांत पडालबिडाल.

म०:—आतां मी स्वतंत्र झालोंय. खड्डयांत पडेन नाहीं तर डोंगराबर चढेन.

ली०:—दादा, आम्ही तुमच्या खड्यांत पडण्याच्या स्वातंत्र्याचे आड येत नाहीं; पण प्रथम थोडं खा, प्यान् मग ताकद आली कीं घरीं जा.

म०:—कोण बोलत आहे ! कुणी दिसत तर नाहीं. आवाज मात्र एका मैलावरून खोल येत आहे.

ली०:—अहो आमचा आवाज खोल गेला नाहीं, तर आपली ऐकण्याची शक्ति खोल गेली आहे.

मं०:—उपासामुळं तुम्हांला कांगोरी आली आहे. त्यामुळं कमी दिसतंय आन् ऐकूं पण कमी येतंय्. तुमच्यापासून आम्ही दहा कदमांबर उभे आहोंत. या इकडं. बसा त्या खाटेवर. ( महाशब्दे खाटेवर बसतात. यल्ली रसाचं भांडं मंजूळच्या हातांत देते. ) भूमिगतांनीं तुमच्यासारख्या संताचा अपमान केला. त्यांना क्षमा करा. तुमची देशाला फार जरूरी आहे. म्हणून मी देशाची शपथ घालतें तुम्हांला कीं, येवढा हा मुसुंब्याचा रस प्राशन करावा.

ली०:—एक, दोन, तीन.

म०:—पण हा मुसुंब्याचाच रस आहे ना !

मं०:—चव घेऊन पहा. चला, पिऊन टाका.

( महाशब्दे रस घटघट पितात. )

ली०:—( घाईनं शब्द उच्चारते ) एक, दोन, तीन.

म०:—( ओठ चाटीत ) वः सुंदर ! एक हजार वर्षांच्या तहानेनंतर स्वराज्य मिळाल्याप्रमाणं वाटत आहे. वः वः ! नामी ! मुसुंब तें मुसुंब ! !

बा०:—महाराज, हें दूध प्यावं. ( महाशब्दे दूध पितात. )

म०:—वः ! हुशारी आली कीं.

गुं०:—हीं केळीं खा. ( महाशब्दे केळीं खातात. )

म०:—शक्ति लगेच परत येऊं लागली !

य०:—महाराज, ही झुनकाभाकर खावी.

म०:—आण. आण.

मं०:—( यल्लीचे हातांतून मंजूळ पितळी हिसकून घेते. ) एकदम सगळंच खाल्लंत तर बाधेल ना !

म०:—नाहीं बाधणार. ( मंजूळच्या हातांतून पितळी घेऊन खाऊं लागतो. )

ल०:—अन्न तों प्राण आणि प्राण तों पराक्रम.

श०:—उपासानं प्रकृति खणखणीत होते म्हणतात तें खोटं नाहीं.

म०:—वः ! उपासानं जठराग्नि असा प्रदीप्त होतो !

ली०:—कां नाहीं होणार ! ईडनिंबू पाचकच आहे.

म०:—मी प्यालों तो ईडनिंबाचा रस !

ली०:—यांत काय संशय ? आणि तेंहि चोरीचं ! साखर घातली होती त्यांत.

म०:—अरेरे ! तुम्हीं सत्याला काळं फासलंत !

श०:—आधुनिक शास्त्राप्रमाणं सत्य अबाधित नाहीं.

म०:—सत्याचे प्रयोग वाचा.

श०:—वाचले आहेत. योगेश्वर गांधींनीं प्रयोगांत जन्म घातला तेव्हां त्यांना सत्याचं दर्शन झालं व त्याबद्दल बोलण्याचा अधिकार आला. रात्रंदिवस लांचलुचपत, काळाबाजार, ठकबाजी करून सत्य मिळत नाहीं.

ली०:—त्याचप्रमाणं, अहो वैष्णवजन, गांधीची खोटी नक्कल करून मोठेपणाहि मिळत नसतो. गांधींचं जगावर प्रेम आहे म्हणून जगाचं गांधींवर आहे. त्यांनीं अन्नसत्याग्रह सुरू केला कीं जगाच्या पोटांत कावळे ओरडतात, जग कासावीस होतं आणि तें 'सत्यानं चालूं' म्हणून गांधीजींना वचन देतं. ( महाशब्दे खाटेवर पडतात व डोळे मिटतात. )

मं०:—अहो महाशब्दे, घरीं जा आधीं. आज तुमच्या घरावर दरोडा यायचा आहे.

म०:—येऊं दे. मी इथंच पडणार. आईग ! अग आई. ( लोळूं लागतात. ) अग आई. पोट तट्ट फुगलं. जीव कासावीस झाला. आतां मरतों.

ली०:—माकडानं मनुष्याची नक्कल केली कीं असंच व्हायचं.

बा०:—गुंडा, पुना ने बाबा त्येला उचलून पडळींत. यल्ले, विटेनं त्येचं पोट शेक आन् ओवा खायाला दे त्येला. ( गुंडा महाशब्द्यांना उचलून आंत नेतो. सर्वजण त्याच्या मागं जातात. लीलान् बाजा मागं राहतात.)

बा०:—आज मातुर हा पोकळ सबुद भरीव सबुद झालाय.

ली०:—बाजा, तूं महाशब्द्याऐवजीं आमचं घर लूट. मला या पातकी पैशाचा वीट आला आहे. बाबांनीं आपली सगळी कमाई पीराच्या भिंतींत ठेवली आहे. ती लुटून गरीबांच्या राज्याला बक्षिस दे. बाबांना शिक्षा पाहिजेच.

बा०:—महाशब्द्याला सूक्षम सोडनार नाय. तो मानसाच्या रगतीवर जगतो. मी दोघांना बी लुटीन. आन् इस्वासला माझं कतुक करून दावीन. इत्यारं खरेदी कराया आमास्नी पैक्याची जरूरी हाय.

ली०:—पण तूं कसा बेत करशील ? गांवांत पोलिसांचं गेट बसलंय.

बा०:—रातचा तमाशा करूं उभा हृथं. म्हंजी संमदं इकडंच लोटत्याल.

# अंक ४ था

( सीन तोच. आंब्यापासून एक पडदा टांगला आहे. पडद्यांत डफावर थाप पडते. हळुंहळूं लोक जमतात. रावबहाद्दूर व माने, दारूच्या बाटल्या व गलासं हातांत धरून झुकत, झोकांड्या खात येतात. )

मा०:—कुठं आहेत कोल्हाटणी ? अजून घुगुर बांधले नाहींत त्यांनीं ? बदमाश छटाक्या ! हंटरन बडवीन त्यांना ! ( पडदा बाजूला करून माने आंत डोकावतो. ) रावबहाद्दूर. शुक् शुक्.

रा. ब०:—( मान्यांचं अनुकरण करतो. व पडद्यांत डोकावतो. ) ऑं ! या तर अप्सरा आहेत. शिंच्या कोल्हाटणी कुठं गेल्या ?

मा०:—रावबहाद्दूर, जास्त झाली बरं !

रा. ब०:—मी रावबहाद्दूर आहें. सरकारनं मला रावबहाद्दूर केलंय. मला जास्त होईल ? कध्धीं होणार नाहीं. मानेसाहेब, कबूल करा. ह्या इंद्राच्या रंभाउर्वशी आहेत.

मा०:—काय बोलतां ! ती अलिकडची मंजूळ आहे. मीं ओळखली तिला. रंगामुळ तुम्ही फसत आहांत.

रा. ब०:—आन् तें दुसरं पाखरूं कोण आहे ?

मा०:—आंत जाऊन बघूं. आपल्याला कुणाची डर आहे ? ( माने व रावबहाद्दूर दोघे आंत जायाला निघतात. विदूषक किरकिरं वाजवतो. दोघेहि दचकतात.)

वि०:—किरकिऱ्यास्नी भ्येतां ? मग तोफाबंदुका उडाल्या तर काय कराल ? ( पडद्यांत बंदुकांचे आवाज होतात. )

रा. ब०:—मानेसाहेब, ऐका. बाजाचा सबुद म्हंजी सबुद. ( टाळी देतात. )

मा०:—बस्स. आज तमाशा रंगलाच पाहिजे.

रा. ब०:---ए तमासगीर, कोल्हाटणींना निरोप दे कीं, आज चवली-पावली दिसायची नाय तुला. यांत फक्त दहादहाच्या नोटा आहेत. ( थैली दाखवतो. ) मानेसाहेब, वाटेल तेवढं प्यान् वाटेल तेवढा दौलतजादा करा. ( एक गोंधळी तिथं येतो व रामराम करतो. )

गों०:—समस्त मर्द तर्फ रानगांव, फरारी मर्द तुमास्नी बलावीत हाय.

मा.-रा. ब०:—( एकदम ) कुठं आहे ! कुठं आहे फरारी !

गों०:—तमाशाला वाइच येळ हाय तवा फरारी मर्दांचा पवाडा म्हंगतों. ऐका गरीबाचा सबुद.

लोकः---म्हण. म्हण.

मा.-रा. ब०:---चालता हो. इथं तमाशा होणार आहे.

गों०:—तुमास्नी नाय दावीत म्हनून. मर्दास्नी दावतों.

गों०:—भरिस्वारि वादळावरी। राघुभरारी। मर्द फरारी।
मरनाला मारी। हाच काय त्याचि गुन्हंगारी। मुर्दांनो खरा ॥ १ ॥

तळहातिं धरुनिया शीर। तोडुन जंजीर। फोडुन पंजीर।
गरुड आधीऽर। गाठन्या इस्नुमंदीर। निघाला तीर ॥ २ ॥

पकडण्या हरीचा लाल। झिजवितां तळ। बुटांचं खिळं।
फुकट रानोमाळ। धांवतां, परी तो काळ। उडविल राळ ॥ ३ ॥

किस्नेंत देऊन तो बुडी। निघेल गंगथडी। तुम्हांवर कडी।
करुन, मारिल दडी। मागं घालाल नाच फुगडी। गडी बेगडी ॥ ४ ॥

पतिवर्ता त्याचि कटांत। पोळि काठांत। नार ओठांत।
हिंडे थाटांऽत। त्याच्या संगं रान घाटांत। गांव हाटांत ॥ ५ ॥

त्याचा माग निघंल वावरांत। निघंल शिवारांत। पुन्हां साभरांत।
गिरीगव्हरांत। फौजदारा करुन मधरात। चौकिठान्यांत ॥ ६ ॥

रा. ब०: —वाहवा, मानेसाहेब, पवाडा अंगलट येतोय तुमच्या.

मा०:—सगळा ऐकू द्या म्हणजे जिरवितों मस्ती.

गों०।—जरि माजलात पोळनंदी । पिळुन खुरमुंडी ।
आटविल चांदि ।
करिल नालंबऽदी । पत्री सरकारचा खुषबंदी । सरदार संदी ॥७॥

रा. ब०:—होः होः होः. होः होः होः !

मा०:—बिशाद आहे. हसतां काय! मी माने फौजदार आहे ! (मिशीला पीळ भरतो.)

गों०:—नका घालूं मिशीला पिळ । बघुन ठेवा शिळ । लपाया बिळ ।
मरायास मनाशिळ । पगडिचं कापिल तो झिळमिळं ।
खोटं नच तिळं ॥८॥

मा०:—इंग्रज सरकार मेलं नाय अझून.

गों०:—इंग्रजी आधार नामर्दा । कटीवर नर्दा । बसत बेदर्दा ।
परि करिल तो खुर्दा । पगडयांत धरुनशान गड्दा ।
पाडिल मुड्दा ॥९॥

पाडील पाउस गोळ्यांचा । तसा छऱ्यांचा । मिशिनिच्या गन्चा ।
पाउस वळिवाचा । वरुषाव करिल धारांचा । मार गारांचा ॥१०॥
सांगेल बिंग कोन त्याचं । आनिल गरिबांचं । राज्य रामाचं ।
तिथं बिन दामाऽचं । खात्याल समदं घामाचं । नाय हरामाचं ॥११॥
हा माझा सबुद सबुदांत । धरा ध्यानांत । देइ वचनांत ।
हतावर हात । होईल खरी ही बात । थोडया दिवसांत ॥१२॥

मा०:—स्टॉप्, रास्कल, हरामखोरा, माझी चेष्टा करतोस ? (गुंडाचा धमला ओढतो.) गुंडा, तूं पण कटवाल्यांना सामील झालास ? कॉन्स्टेबल, पकडा याला. (कॉन्स्टेबल गुंडाला पकडतात..)

लोकः—अवं पन कशापायीं ! पवाड्यांत नक्कल केली म्हून !

रा. ब०:—मानेसाहेब, जाऊं द्या. हें खेडेगांव आहे. इथं हरहमेश अशाच गंमती चालतात.

मा०:—हंसतां काय ! हा राजद्रोह आहे. ( गुंडाला ओढतो. )

रा. ब०:—मानेसाहेब, माझं ऐका. छटाक्यांच्या लावण्यांचा विरस होईल. दंगा करूं नका. ते पाहा. कुणी साहेब लोक आले आहेत. सगळे-जण चीपचाप बसा.

मा०:— (घाबऱ्या आवाजांत) ए, दे सोडून त्याला. ( कॉन्स्टेबलला माने खूण करतात. साहेब हंटर कडकवीत प्रवेश करतात. सर्वजण भयभीत होतात. )

रा. ब०, मा०:—( एकदम ) सलाम, साहेब.

सा०:—कुठं हाय तो रावबहाद्दूर ?

रा. ब. नरसिंगरावः—मी इथं आहें साहेब, सेवेशीं.

सा०:—तूं नकोस मला. हा पाहा माझा माणूस. ( एका इसमाचा कान पकडून गर्दीतून काढतो. त्याच्या हातांत एक करंडा असतो. ) याला रावबहाद्दूर उगीच केलं मीं. ( चाबकानें मारतो. )

तमाशांतील रा. ब०:—याला मी आपला कृपाप्रसाद समजतों.

सा०:—मग घे आणखी. ( लाथाबुक्या मारतो. )

मा०:—रावबहाद्दूर, हॉः हॉः हॉः रावबहाद्दुराचं सोंग पण सोंग आणलं आहे. हः हः हः !

रा. ब० नरसिंग०:—हलकट, साले !

मा०:—जाऊं द्या हो. खेडेगांवचा तमाशा आहे हा. हाः हाः हाः! खेडेगांव आहे हें.

तमाशांतील रा. ब०:—साहेब, तुमचा एक फाटका बूट मला द्या म्हणजे रोज त्याचं तीर्थ घेऊन पीत जाईन.

सा०:—कितीरे लोचट आहेस ! फिरायला गेलों, जेवायाला बसलों, तरी तूं मागं आहेसच. पिकनिक्‌ला गेलों, हनीमूनला गेलों तरी तूं हातभार लावायला हजरच. फार काय बाथरूम, वॉटरक्लोजेटमध्यें कांहीं काम सांगा म्हणून हात जोडून उभा आहेसच. ( सर्व लोक हंसतात. )

तमाशांतील रा. ब०:—सर, मी तुमचा सेवक आहें.

मा०:—हाः हाः हाः ! रावबहाद्दूर. नामी ! नामी ! संक्रांत आतां तुमच्यावर फिरली आहे बरं का ! पण जाऊं द्या. हें खेडेगांव आहे. हाः हाः हाः !

सा०:—अरे रावबहाद्दुरा ! कोट पाटलूण कशी घालायची, डोक्याला शिसरन् गळ्यांत दावं कसं अडकवायचं, प्रतिज्ञेवर खोटं कसं बोलायचं, नादारी अर्ज कसा दाखल करायचा, वडिलांची आज्ञा कशी मोडायची, स्वजनांचा द्रोह कसा करायचा, व्हिस्की सोड्यांत कशी घालायची नि प्यायची येवढ्या गोष्टी मीं तुला शिकवल्या तरी तूं माझा पिच्छा सोडीत नाहींस !

त० रा. ब०:—साहेब, मीं कोहिनूरचं पार्सल आणलं आहे. ( रा. ब. साहेबाला अंड्यांचा करंडा दाखवतो. )

सा०:—हंः ! हीं तर बिन देठाचीं फळं आहेत.

त० रा. ब०:—साहेब, कोहिनूर कोंबडीच्या अंड्यायेवढा आहे म्हणतात. म्हणून मी अंड्याला कोहिनूर म्हणतों.

सा०:—बारे काळा अदमी ! अंडं देऊन कोंबडी काढणारा !

त० रा. ब०:—साहेब, आज आठ आगस्ट १९४२ आहे. तरी कॉंग्रेसच्या न् जनतेच्या नाकावर टिच्चून ही भेट आणली आहे मी आपल्याकरितां.

सा०:—बस्स. एकदम खूष आहें मी. काय पाहिजे तें माग.

त० रा. ब०:—मला राजाबहाद्दुर करावं.

सा०:—सरकारची मोठी कामगिरी करून दाखविल्याशिवाय तें शक्य नाहीं.

रा. ब०ः—( पोथी वाचल्याच्या चालीवर ) मला कामगिरी सांगा. बंगालसारखा दुष्काळ पाडून दाखवतों, भूमिगतांचीं हाडं रगडून दाखवतों, त्यांना मदत करणाऱ्या लोकांचीं घरंदारं दरोडखोरांकडून लुटून जाळून खाक करतों. कॉंग्रेसचे कार्यकर्ते पैशाच्या लालुचीनें फितुर करतों. बंडखोर देशाचे सांधे उखडतों. आज ता. ८ आगस्ट १९४२ ते दिवशीं हिंदुस्थानचें बिन अटीचें कायम खरेदीखत राजीखुषीनें व अक्कलहुशारीनें लिहून देतों तें येणेंप्रमाणें. आजपर्यंत हिंदुस्थानदेश तुमच्याकडं फुटक्या कवडीला गहाण होता. तो मी आज रोजीं तुम्हांस खुषखरेदी देत आहें. आजपासून आकाशांत चंद्रसूर्य आहेत तोंपर्यंत हिंदुस्थानचा मालकी हक्कानं पुत्रपौत्र लेकरानुलेकरें उपभोग घ्यावा. त्यास आम्हां किंवा आमचे वालीवारस हरकत करणार नाहींत. तुमच्या मालकी हक्काच्या स्वातंत्र्यास किंवा आमच्या पारतंत्र्यास कुणी हरकत आले तर आम्ही आमचें रक्त सांडून तुमचा हक्क शाबित करून देऊं. तुमची गुलामगिरी आम्ही आमच्या हयातीपर्यंत व आमचे पश्चात् आमचे वालीवारस चालवतील. हें लिहून दिलें. दस्तुर खुद्द. सही रावबहाद्दूर गायकैवारी. साक्ष बाजीराव रघुनाथ भट पेशवे. पूर्वी रा. पुणें पेठ कसबा शनवारवाडा, हल्लीं वस्ती स्वर्गाच्या पिछाडीला. उमीचंद दलीचंद मारवाडी, राहणार कलकत्ता, हल्लीं वस्ती सदर.

रा. ब. नरसिंगरावः—हरामखोरांनो, माझ्या हद्दींत माझं सोंग काढतां ! ( मारण्याकरितां उठतो. इतक्यांत गाण्याचे सूर ऐकूं येतात. )

मा०ः—रावबहाद्दूर, छोड देव. कोल्हाटणीच्या लावण्यांचा विरस होईल.

( कोल्हाटणी ठुमकत येतात. माने व रावबहाद्दूर त्यांचेकडं कावरे-बावरे होऊन पाहतात. दारूचीं ग्लासं झोकतात. नोटा फेंकून दौलतजादा करतात. रावबहाद्दूर राग वगैरे सर्व विसरून जातात. )

रा. ब०—ए कोल्हाटणी, आज पंचकल्याणी उडाला पाहिजे.

कोल्हा०ः—वः सरकार ! तुम्ही घोड्यावर चढूनच बोलतां कीं !

मा०:—रावबहाद्दूर, कैसा मारा. क्या मारा.

रा. ब०:—छटेल आहे छटाकी. पण तिनं जोड्यानं मारलं तरी फुलं पडलीं म्हणून आम्ही म्हणूं.

मं०:—हलकटच आम्ही कोल्हाटणी, लावण्या म्हणणाऱ्या. पन समद्या बाटल्यांत जसं गंगाजल नसतं तसं समद्याच कोल्हाटणी हलकट नसतात. आन् तुम्हास्नी काय वाटतं? लावण्या तेवढ्या हतून थतून चावट! नाहीं? ऐकाच तर. (गाते.)

महाराष्ट्र देश लइ दणकट ग। राठ हाडपेर दुहेरि मनगट ग ॥

(मंजूळ व दुसरी कोल्हाटीण नाचतात.)

मा०:—वाहवा! बहार! (मनगट नाचवतो.) आम्ही मराठे तसेंच आहोंत. पहा आमचीं मनगटं.

एक:—तरी नारून इडकल्याती.

मं०:—शूरवीर रणधीर म्हणुन जगिं डंका चाले ॥ धृ० ॥

रा. ब०:—वा! वा! मार डाला.

मं०:—बारा मावळ चढे अंतराळ ॥ दरीखोरि मुलुख डोंगराळ ॥
कडेकपारा पठार विक्राळ ॥ हिरवे रान भयाण दरडी माळ ॥
नद्या धांवतात ओढाळ ॥ सांपळा शत्रुला ठरविति काळ ॥
खिंडित गनिमी घाले ॥१॥

रा. ब०:—बहारदार. आमचं मावळ तसंच आहे मुळीं. मी मूळचा मावळ्याच. अझून मावळी पागोटं आहे आमच्या घरीं.

मं०:—चौदा ताल कोंकण पाताळिं ॥
वेळेवर केळि, नारळि, फोफळी ॥
अवघड ताड, माड, भेरळी ॥ त्यावर लुसलुसती नागवेलि ॥
कोकम, फणस, काजु, निंब, आंवळि ॥

तोरणं, आठुरणं, करवंद जाळि ॥
दर्यांत जहाज डोले ॥२॥

मा०:—रावबहाद्दुर, मी पण मूळचा कोंकण्या आई. माझं कोंकण उभं केलं कोल्हाटणीनं माझ्यासमोर. बघा, माझ्या डोळ्यांत आसवं आलीं.

मं०:—पाहा, सह्याद्रिचा रणसुभा ॥
नाटकगृहिं भरली पर्वतसभा ॥
कीं मयासुरी राक्षसगण उभा ॥
डोक्यावर घेउन निळसर नभा ॥
माथ्यावर उठालि प्रकाशप्रभा ॥ फेकी स्वातंत्र्य उषा दुर्लभा ॥
किरणांचे वर भाले ॥३॥

लोकः—शिवाजी महाराजकी जय ! महात्मा गांधीकी जय !

रा. ब०:—स्फुरण चढलं बघा मला.

मा०:—मलासुद्धां.

एकः—गानंच हाय तसं इरसीचं.

मं०:—मोगरी, जाइजुई, नेवाळी ॥
निंबचंदन पारिजातबकुळी ॥
शेवती, गुलाब, चाफेकळी ॥ रानांत कारवकुडा सायलि ॥
गोंधणी, खैर शमि बाभळी ॥ सुरंगी, आंबा, उंबर, जांभळी ॥
आनंदभुवन घमघमलें ॥४॥

लोकः—सुंदर, बहार. सुंदर.

मं०:—चढ उतार, भाटी, पाउलवाट ॥
मांडीपोटरिंत आणती बाठं ॥
पिळणं, वळणं, गवंड, कर्वत घाट ॥ करति नरनारी कमरंत ताठ ॥
पायांखालीं मुडपती काटं ॥ छातिला ये पाषाणाचा घाट ॥
भुजदंड पिळे नागबळे ॥५॥

मा०ः—हाय. हाय. बघुं दे ते भुजदंड. (मंजूळचा हात धरून कुरवाळण्याचा प्रयत्न करतो. मंजूळ त्याला ढकलते. तो कोलमडून पडतो. लोक हंसतात.)

लोकः—बराबर केलंस. कमरेंत एक लाथ हान.

मं०ः—पाभरी, नांगर, विळे, कोयते ॥

घडविती व्यायाम खरे आयते ॥

भाले, बर्चि, कुऱ्हाडिचे पाते ॥ एका घावांत वितभर जाते ॥

झोडणिचे हात चालती पट्टे ॥ गज, गेंडे, छावे, बिचवे, पट्टे ॥

लढवय्ये डोंगरि किल्ले ॥६॥

मा०ः—बस्स. बस्स. बहार.

रा. ब०ः—बेहद्द बहार. (माने मंजूळला पकडतो व रा. ब. दुसऱ्या कोल्हाटणीला पकडतो. गुंडा मान्याला ओढून काढतो.)

कोल्हा०ः—बाबा, बाबा, काय करतां हें ?

रा. ब०ः—काय ? कोण तूं ?

को०ः—बाबा, मी तुमची मुलगी लीला ना ? अजून ओळखलं नाहीं मला ?

रा. ब०ः—तूं ! लीला ! माझी लीला ! आणि तमाशांत !

(महाशब्दे तिथं येतात.)

म०ः—अहो, हा साधा तमाशा नाहीं. भूमिगतांचा आहे हा तमाशा ! मानेसाहेब, फुकट खातां सरकारचा पगार. या सगळ्यांना अटक करा. यांनीं माझा वाडा लुटला.

रा. ब०ः—अरेरे ! किती नीच आहें मी ! स्वतःच्या लेकीवर भाळलों न् तिच्यावर दौलतजादा उडवला ! हर् हर !

विदूषकः—बाबा, तो तुमचा अपराध नाहीं. दारूचा आहे.

रा. ब०:—शरद्, तूं पण या कटांत ! सोडली. लीला, आजपासून मीं दारू सोडली.

( दारूचा ग्लास आपटून फोडतो. )

ली०:—बाबा, गुलामगिरीचं व्यसन दारूपेक्षांहि वाईट आहे. दारू-बरोबर साहेबलोकांची हांजी हांजी पण सोडा.

रा. ब०:—लीले, साहेबांच्या कृपेवर तर आपण श्रीमंत झालों, माड्याहवेल्या बांधल्या, गुळासाखरेचे कारखाने काढले. माझी सगळी मिळकत, पैसा, धन दौलत.........

( बाजा प्रवेश करतो. )

बा०:—समदी खलास हाय. महासबुदच्या वाड्यावर दरोडा पडला तो तुम्ही घातला या संशयानं त्यानं तुमचा बंगला काँग्रेसच्या लोकांकडून लुटवला. भिंतींतल्या पीराला भगदाड पाडून समदं वाहून नेलं.

रा. ब०:—बाजा, काय म्हणतोस ? माझं सर्वस्व लुटून नेलं काँग्रेसच्या लोकांनीं ? नाहीं. तूं लबाड आहेस. सगळी कळ तुझ्याजवळ आहे. तुझा लेक कटवाल्यांना सामील आहे.

बा०:—वा रावभाद्दूर ! माझा पोरगा कटांत हाय म्हून मी चोर. आन् तुमची लेक कटांत हाय मग तुम्ही कोन ? अवं या काँग्रेसनं समदीं कार्टी बिघडविल्याती. तुमचीं, आमचीं न् समद्यांचीच. पन बाजा आपलं इमान सोडनार नाय कधीं. बाजाचा सबुद म्हंजी सबुद. हा महासबुद हाय या समद्यांच्या बुडाशीं.

रा. ब०:—बस्स. आतां मी माझे कारखाने विकीन, पण या काँग्रेसची राखरांगोळी करीन. मानेसाहेब, पकडा या जटायूला. हा याच डाक्या-करितां फरारी झाला होता.

म०:—मी फरारी झालों होतों ? वः ! अहो भूमिगतांची इथं सभा झाली, त्यांनीं मला बोलवून घेतलं. मी त्यांना अत्याचारांना मदत देईना तेव्हां त्यांनीं मला खंडोबाच्या घळींत कोंडून ठेवलं. मीं प्राणांतिक उपोषण

सुरू केलं तेव्हां त्यांनीं घाबरून मला सोडून दिलं. मी कालच तुम्हाला बातमी देणार होतों; परंतु उपोषणानं मी अगदीं थकून गेलों होतों. हा गुंडा, ही मंजूळ कटांत आहेत. हिच कोल्हाटणीचं नुसतं सोंग आहे.

मा०:—ए टवळे, खरं सांग तूं कोण आहेस ?

मं०:—मी होय ? टवळी !

मा०:—पाहूं माझ्या मारापुढं टवळी किती टिकते ती ?

म०:—बाजाला पण पकडा. त्याच्याच पडळीवर हे सगळे खेळ चालतात.

बा०:—चोराच्या उलट्या बोंबा ! साहेब, हे कॉंग्रेसवाले काय वाटेल तें करतील ! उजून साव म्हून मिरवितील !

रा. ब०:—मानेसाहेब, हा महाशब्दे काय कमी आहे पाताळयंत्री ! याच्यावर तरी विश्वास कसा ठेवायचा ? आणि हें पाहा, जरा इकडं या. बाजानं सरकारची......

मा०:—कळलं. महाशब्दे, तुमचा बाजावर आरोप आहे, बाजाचा तुमच्यावर. पुरावा मिळेपर्यंत आम्हाला दोघांना तरी अटक करावयास पाहिजे, नाहीं तर दोघांनाहि खुलं ठेवलं पाहिजे. अडली, चल यांना घेऊन. ( पोलिस मंजूळ, लीला व गुंडा यांना अटक करतात. )

रा. ब०:—मानेसाहेब, ही तुमची थैली राहिली ती घ्या. ( रावबाहाद्दुर मान्यांना थैली देतात. )

रा. ब०:—लीलाम् शरदूला मी जामीन राहतों.

मा०:—ठीक आहे. पण सांगूं तेव्हां हजर करा. पोलिस, सोडा त्यांना. ( पोलिस शरद्-लीला यांना सोडतात. बाजाशिवाय सर्व जातात. विश्वास येतो. )

बा०:—इसूवाळ, खाजगी सबुदन् देसाला दिलेला सबुद यांचं मोल करतांना बाजा चुकला पन बैमान झाला नाय. एका इमानानं त्येला दुसऱ्या इमानाइरुध उठवलं. ( जिरग्या येतो. ) जिरग्या, रावभाद्दुराची

दौलत दाव. (जिरग्या सांगितल्याप्रमाणं दरोड्यांतला माल दाखवतो.) यांतलं मला कायबी नगं. समदं कांग्रेसला द्या.

वि०:—काँग्रेस चोरीचा माल घेत नसते. हा माल रावबहाद्दुराला परत कर.

बा०:—मग सरकारी खजिना कसा लुटला?

वि०:—सध्यां खरं सरकार काँग्रेस आहे. दुसऱ्या सरकारला काँग्रेस प्रजेकडून कर वसूल करूं देणार नाहीं.

बा०:—इस्वास, ही रावभाद्दुराची जन्माची कमाई हाय.

वि०:—मला पाहण्याचं कारण नाहीं. आमची खरी संपत्ति आमचे लोक.

बा०:—यांनून हत्यारं विकत घ्या. गरीबांचं राज्य करा. गरीबांच्या राज्याला हा नजराणा देत हाय मी निंबगांवचा बाजा रामोशी.

वि०:—बस्स. बोलूं नकोस. आधीं रावबहाद्दुराकडं जा.

बा०:—मरो तो रावभाद्दूर. फौजदारानं मंजूळ, गुंडा ह्यास्नी पकडून नेलं हाय. पहिलं त्यांना सोडवलं पाहिजे.

वि०:—मला तें कळलं म्हणून तर मी इथं आलों. त्यांना कसं सोडवायाचं तें मीं ठरवलं आहे. तूं तुझ्या कामाला जा.

बा०:—मला गुंडाची काळजी नाय. पन माने लई खराब हाय. मंजूळची अब्रू इरंस हाय.

वि०:—मान्याला प्रतिकार करायला मंजूळ समर्थ आहे. मान्याला ती दाद देणार नाहीं व त्याची पण छाति होणार नाहीं. मंजूळच्या धडाडीनं आपण तिला सोडवूं या.

बा०:—मी उजाडायच्या आंत समदं गांव उठवतों आन् माझं लोक घेऊनशानी चावडीवर हल्ला करतों आन् तिला सोडवून आनतों.

वि०:—पोलिसांचा जमाव मोठा आहे. आपले सशस्त्र वीर पांगले

आहेत. कमींत कमी हिंसा करून आपला कार्यभाग साधणं याचं नांव अहिंसा. मी युक्तीनं या सर्वांना सोडवून आणीन. तूं निर्धास्त राहा.

बा०:—बाजा मर्द हाय. मर्द मरणाला भीत नाय. यापरिस मरण बरं.

वि०:—खरं आहे. मरणप्राय कर्तव्याला फक्त मर्द तोंड देतो. मंजूळपेक्षां देश मोठा आहे. जा. हें वीष रावबहाद्दुराला देऊन टाक.

( बाजा दौलत घेऊन जातो. पोलिसच्या वेशांत एक इसम येतो. )

वि०:—आणलास वारंटाचा फार्म ?

पो०:—सगळा मजकूर भरून आणला आहे. सही करा फक्त. ( फौंटनपेन देतो. विश्वास सही करतो. )

वि०:—जा. सकाळीं मान्यावर वारंट बजाव. ( पोलीस जातो. यल्ली पडळींतून येते. )

य०:—कारभारी, आनला गुंडाला ?

वि०:—कारभारी नाहीं, मी आहें.

य०:—इस्वास, चांगलं उपकार फेडलेत तुमास्नी आसरा दिला त्याचे ! आतां ते यम माझ्या बाळाचे हालहाल करतील.

वि०:—यल्ले, मी तुझा सर्वस्वीं अपराधी आहें. पण तूं जरा धीरानं घे. उद्यां सकाळपर्यंत मी गुंडाला सोडवीन. परंतु तुमच्याकडून घाई होतां कामा नये.

य०:—तें काय नाय चालायचं. माझा गुंडा आतांच्या आतां आनुन-श्यानी द्या. नाय तर मी समदं बेंड फोडतें.

वि०:—फोड. सगळा देश उठला आहे. यांत आतां कांहीं गुपित नाहीं. ( जातो. )

य०:—इस्वास पाटील ! इस्वास पाटील !

( जिरग्या खुर्ची घेऊन येतो. )

य०:—जिरग्या, काय भानगड हाय ? खुर्ची कशाला आनलीस ?

जि०:—परांत सायबाचा मुक्काम हाय इथं.

य०:—( घाबरून ) इथं ! आन् तो कशासाठीं ?

जि०:—ह्यो समदं चालू हाय त्याच्याकरितां. समदी कळ तुमच्या पडळींत हाय अशी बातमी गेलीय सरकारांत.

य०:—अग माझं बयं. आतां काय करूं ? ( पडळींत जाते. )

( लोक टेबलं खुर्च्या मांडतात. ' अशी मांड ', ' इकडं सरकीव ' असे अंधारांत आवाज येतात. मधून मधून लोक ' भरि स्वारि वादळावरी, मर्द फरारी...' ' वगैरे गीत गातात. पुन्हा कोंबडा ओरडतो. सकाळ होते. उन्हं पडतात. शिपाई येतो व तो टेबल लावतो. शिरस्तेदार येतात. फायली काढतात. खुर्चीवर बसतात. उन्हं वाढतात. माने समन्साचा पिवळा कागद वाचीत येतो. )

शिरस्तेदारः—शिपाई, उन्हं फिरली. टेबल जरा इकडं ओढ पाहूं ! ( शिपाई टेबल-खुर्ची सावलीला ओढतो. शिरस्तेदार लिहीत बसतात. )

मा०:—काय हो शिरस्तेदारसाहेब, हें मांडलंय काय तुम्ही ? इं. पि. को. काय ? ३४२ कलम काय ? हें आहे काय ? पोलिस अंमलदारावर फिर्याद ?

शिरस्तेदारः—( लिहितांना तोंड वर करतात. ) काय म्हणतां ?

मा०:—ऑं ! पहिले भाऊसाहेब कुठं गेले ?

शिर०:—जहान्नममधे. (शिरस्तेदार पुन्हा कागदांत डोकं खुपसतात.)

मा०:—जहान्नममधें ?

शिर०:—होय. तिथं त्यांची बदली झाली आहे.

मा०:—आणि समन्सावर सही कोणाची आहे ? हे आखेर कोण ?

शिर०:—जनाव,...

मा०:—मी जनाब नाहीं. हिंदु श्रीयुतच आहे. न्हाव्याचा बखा उतला म्हणून दाढी वाढवावी लागली आहे मला.

शिर०:—असं होय! मी तर घाबरून गेलों होतों. म्हटलं कुणी भूमिगत आलाय कीं काय सोंग घेऊन फौजदाराचं!

मा०:—हाः हाः हाः! द्या टाळी. मला देखील तुमच्याबद्दल हेंच वाटलं. भीत भीतच मी इथं आलों. अहो किती तरी वेळां त्यांनीं आम्हाला नाटकं करून फसविलं. होः होः होः!

शिर०:—फौजदारसाहेब, माझ्याबद्दलची तुमची भीति गेली. पण माझी गेली नाहीं अजून तुमच्याबद्दलची.

मा०:—हाः हाः हाः! काय बोलणं हें!

शिर०:—बघूं समन्स? (माने समन्स देतो.) हे आखरे नाहींत. ए. के. खरे. आजपासून खोटेसाहेब गेले. खरे आले. पट्टेवाल्यापासून साहेबापर्यंत सर्व नवा जमाना दिसेल तुम्हाला. गेले ते आखरे शेवटचे!

मा०:—कारण?

शिर०:—कारण तुम्ही. तुम्ही फरारी पकडण्यांत कसूर केलीत म्हणून तारेनें बदल्या झाल्या आमच्या न् बायकापोरं सोडून आम्हांला यावं लागलं इथं. आतां साहेबांनीं भूमिगतांची खोड मोडण्याकरितां इथं पडळीवर महिनाभर मुक्काम ठेवण्याचा हुकुम केलाय.

मा०:—आतां जुळलं सगळं. आन् तुमचा हा खादीवेष म्हणजे गनिमी कावा आहे कीं नाहीं? खरं सांगा!

शिर०:—साहेबानींच तसा हुकुम दिला आहे. आणि तुम्हाला देखील तसाच पोषाख करावा लागेल. नाहीं तर पहिल्या भाऊसाहेबांच्या गांवीं बदली होईल तुमची. हाः हाः हाः!

मा०:—हाः हाः हाः! अरे बापरे, साहेबाची मोटार आली वाटतं? पहिल्याच साहेबांची गाडी दिसतेय.

पट्टेवालाः—हुशियार! (साहेब येतात. खुर्चीवर बसतात. सर्वजण उभे राहून खडी ताजीम देतात.)

पट्टे०:—अर्जदार! आरोप्पी! (माने उठून उभे राहतात. शिरस्तेदार खऱ्यांच्यापुढं केसपेपर्स देतात.)

ख०:—माने फौजदार ! काय म्हणणं आहे तुझं ?

मा०:—साहेब, ही कॉंग्रेसची अदावत आहे. फिर्याद खोटी ठरवून फिर्यादीला खोट्या फिर्यादीबद्दल दंड करावा.

ख०:—येव्हढंच तुझं म्हणणं ?

मा०:—गुंडा, मंजूळ वगैरे इसमांनीं सरकारविरुद्ध कट केला आहे.

ख०:—(हंसून) आपल्या सरकारविरुद्ध कट ! त्यांना हजर करा माझ्यासमोर.

मा०:—(हंसून) पोलीस इतक्यांत त्यांना घेऊन येतील रिमांडकरतां.

ख०:—रिमांड ? ती कशाकरितां ?

मा०:—कबुलीजबाबाकरितां.

ख०:—कट्टर कॉंग्रेसवाले असले तर कबुलीजबाब देणार नाहींत.

मा०:—साहेब, बढाई मारूं नये.. पण मला माने फौजदार म्हणतात. तीन पिढ्या पोलिशी आमच्या घराण्यांत आहे. माझ्या पोतडींत कैक युक्त्या आहेत आरोपींना वठणीवर आणण्याच्या. आतांच त्यांना भरमप्पान् सुंदरीचा प्रसाद देऊन आलों आहे.

ख०:—म्हणजे फिर्यादीचं म्हणणं पुष्कळ खरं दिसतंय.

मा०:—मी काय खरं बोलायला डरतोय ? वरून हुकुमच तसे आले आहेत.

ख०:—माने, तूं मोठा दुष्ट फौजदार दिसतोस. देशाबद्दल अगदींच कसं प्रेम नाहीं तुला !

मा०:—मी सरकारचं नमक खातों.

ख०:—सरकारचं नमक !. नमक परमेश्वर समुद्रांत पिकवतो आणि तें जो खाईल त्याचं आहे. माने, मी तुला पन्नास पत्र्या मारण्याची शिक्षा देतों. शिपाई, आरोपीला ताब्यांत घ्या.

मा०:—अरे बापरे ! हें पत्री सरकारचें कोर्ट ! काय हो भाऊसाहेब ?

शिर०:—आतां कुठले भाऊसाहेब ?

मा०:—तरी मला मघापासून सशय येत आहे कीं कोर्टाचा तोंडवळान्...काय बरं तुमचं नांव ? आठवले. खरे ना ! ( विश्वास येतो. ) अर्ज्या, आतां मला वांचीव.

वि०:—आतां कुठला अर्ज्या ! तो राहिला ब्रिटिश हद्दींत.

मा०:—तूंहि अर्ज्या रामोशी नाहींस ? मग कोण आहेस ?

वि०:—कॉंग्रेसचा शिपाई.

मा०:—विश्वास पाटील, आतां ओळखलं तुम्हाला ! कमाल झाली तुमच्या धाडसाची !

बा०:—( प्रवेश करून ) कमाल अझून म्होरंच हाय. नदीच्या अब-काळ्या पुराच्या पल्याड. ती बघा पंढरीची यात्रा, झेंडं घेऊन मंजूळलान् गुंडाला सोडवून आनायासाठीं तालुक्याच्या पोलिस ठाण्यावर जायाला निघाली हाय. आन् ह्यो पघा इकडं. सरकारजमा रावभादूदुराच्या लेकीनं हा दुसरा मोर्चा काढलाय गांवांतून.

मा०:—ओ हो हो ! काय सुंदर देखावा ! नदीप्रमाणं माणसांचा दुथडीपूर लोटलाय. झेंडे तरी किती आहेत ! आंबा, लिंब, बाभुळ, पिंपळ देखील झेंड्यांनीं गजबजलेत. देवळाचीं शिखरं पण भरलींत झेंड्यांनीं !

बा०:—मानेसाहेब, गुढीचा पाडवा हाय आज. बघा. बघा.

वि०:—आज माझ्या डोळ्यांचं पारणं फिटलं. बाजा, आज गांधीयुग सुरू झालं. त्यांतील पहिल्या वर्षाचा पहिला दिवस आज आहे. हें पाहून माझ्या अंगावर रोमांच उभे राहिलेत. पण त्याच वेळीं एक भीति पण मला भेडसावीत आहे. कांहीं घोटाळा नाहींना उडायचा ?

मा०:—घोटाळा काय उडायचा आहे ! जिवावर उदार झालेल्या या वीरांच्या हातांत हत्यारं पडलीं तर हे जग जिंकतील.

बा०:—थोडया दिवसांमागं ह्येच लोक तुमचं नांव ऐकलं कीं पळत सुटायचं ! आन् आतां छातीवर रैफलीच्या गोळ्या झेलायास्नी तयार हायीत.

तालुक्याला गोरी फौज आनलीय. पन् हे छातिबनाव लोक जिवावर उदार व्हवून त्यांच्या हातांतून रैफली हिसकाबून घेत हायीत. ऐका. एकच सबुद—जय हिंद. एकच आवाज—जय हिंद.

मा०:—अरेरे! स्वातंत्र्याच्या पर्वणींत खाकी कपडे घालून आम्ही पारोसे बसलों आन् परकी सरकार आमच्याच भाकरीचे उष्टेन् शिळे तुकडे आमच्या अंगावर फेंकतें ते चघळीत आहोंत. पाटील, धन्य आहे तुमची! विद्या शिकून तुम्ही देशाकरितां हालअपेष्टा काढीत आमच्यासारख्या फितुरांचा जाच सहन करीत आहांत. तुमच्यापेक्षां या बाजाची धन्य आहे. अशिक्षित असून त्यानं देशाला आपला देह वाहिला. मी पण तुम्हाला न् देशाला माझा सबुद देतों कीं आजपासून मीं परकी सरकारची नोकरी सोडली. हा पट्टा मी देशातर्फे तुमच्या पायांवर वाहतों. कदाचित् तुम्हांला मी हें ढोंग करीत आहें असं वाटेल. परंतु त्याला माझा निरुपाय आहे. संधि मिळाल्याशिवाय मला तरी तुमची खात्री कशी पटवतां येईल?

वि०:—तुम्ही पट्टा सोडूं नका; गळ्यांतच ठेवा. तुमच्यासारख्या पुष्कळ लोकांनीं आम्हांला सबुद दिला आहे. तुम्ही आमचेच आहांत व आम्हांलाच मिळणार ही आमची खात्री होती. तुम्ही ज्या जागीं आहांत तेथूनच आमचा जास्त फायदा कराल. तुम्ही नोकरी सोडूं नका. देश माझ्याइतका तुमचाहि आहे. तुम्ही स्वतःला फसवणार नाहींत. स्वतःचा विश्वासघात करणार नाहींत. आपल्याला स्वराज्य मिळालं तर तुम्ही नाहीं तर तुमचा मुलगा तरी पोलिसांचा मुख्य होईल. आज तीन पिढ्या पोलिशी तुमच्या घराण्यांत आहे. शिपाई, फौजदारसाहेबांना सोडून द्या.

(यली धांवत येते.)

य०:—कारभारी, गुंडास्नी सोडवून आनाया मोर्चा तालुक्याला गेला, पन गुंडा चावडींत होता हें त्यांना माहीत नव्हतं. आपल्या गांवांत मागं लोक राहिले त्यांनीं त्याला आनलं हाय गळ्यांत हार घालूनशानी. कुस्ती जितल्यावर मी त्यास्नी ववाळणार व्हतें, ती आतांच ववाळतें. त्यास्नीं

थांबवा. मी ववाळणीचं सामान आनतें. ( पडळींत जाते. गाण्याचें स्वर ऐकूं येतात.

चरका फिरा फिराके ॥ लेंगे स्वराज्य लेंगे ॥
चालीस करोड दुनिया कप्तान हमारा गांधी ॥
गांधी हुकुम करेंगे ॥ लेंगे स्वराज्य लेंगे ॥

गुंडा, मंजूळ, शरद्, लीला यांना लोक वाजत-गाजत आणतात. त्यांचे-बरोबर झेंडा असतो. लोक 'जय हिंद' 'महात्मा गांधीकी जय,' 'जवाहरलाल नेहरूकी जय,' 'सुभाषचंद्रकी जय' असे जयघोष करतात. ( गुंडा तोंडावर धोतराचा बोळा दाबून येतो. गुंडा थकल्यामुळें पेंगत चालतो व धापा टाकतो. )

बा०:—गुंडा, दम कां छाटितुस ? पोलिसांनीं मारलं तुला ?

( गुंडा अंगावरचे वळ दाखवतो. )

वि०:—शाबास, तरी तूं फुटला नाहींस ?

( गुंडा मानेनें नाहीं म्हणतो. तोंडांतून सबुद काढला नाहीं असं दाखवतो. )

बा०:—तरी तोंडांतून सबुद काढला नाहींस ! वः वः ईर हायेस ! पन तुझं तोंड कां सुजलंय ? बोलत कां नाहींस ? मारामुळं तुला बोलतां येत नाय ? बोल, तोंडानं सांग. मंजूळ, असं काय करतोय गुंडा ?

मं०:—काय सांगूं, बाजा बाबा ! पोलिसांनीं त्याला मार-मारलं पण गुंडा कबूल होईना. परंतु मार जेव्हां सहन होईना तेव्हां...काय सांगूं ? कसं सांगूं ?

बा०:—गुंडा फुटला ? हात मुर्दाडा ! माझ्या हातांत सांपडतास तर त्याच वेळीं तुझी जीभ कापली असती मीं.

मं०:—तेंच केलं त्यानं.

वि०:—म्हणजे ? मंजूळ, बोल. लवकर बोल.

मं०:—इतकं भयंकर आहे तें कीं मला त्याचा उच्चार करण्याचं धैर्य होत नाहीं. तालुक्यांत मान्यांच्या अंमलदारांनीं त्याला इतकं मारलं कीं तोंडांतून फितुरीचा शब्द निघेल म्हणून त्यानं त्याला सांपडलेल्या कांचेच्या तुकड्यानं आपली जीभ कापून घेतली.

मा०:—काय ! गुंडानं जीभ कापून घेतली !

वि०:—मातृभूमीला वाहिली. जीभ कापून देईन पण सबुद फिरवणार नाहीं. हेंच त्यानं पहिल्या भेटींत मला वचन दिलं होतं. त्यानं आपला सबुद खरा केला.

बा०:—गुंडा, काय केलंस हें ? पन नाय. बराबर केलंस. मर्दाचा लेक हायिस तूं. जय मल्हार ! जय हिंद !

य०:—( प्रवेश करून ) बराबर हाय. ( त्याला ओवाळते. सगळ्यांना ओवाळते. अक्षता डोक्यावर टाकते. ) कारभारी, गुंडाची काय दसा झालीय ? तोंड किती सुजलंय ! गुंडा, बोलत कां नाहींस ? हंसत कां नाहींस ? हांस कीं. ( गुंडा हंसतो. )

य०:—हंसलास तोंडभर; आतां बोल.

बा०:—येडे यल्ले, आतां तो कर्म बोलतो ! गुंडानं देसाला कायमचा सबुद दिला. फितुरीचा सबुद तोंडांतून निघेल म्हून त्यानं आपली जीभ कापून घेतली.

य०:—कारभारी, काय बोलता ह्यो ? गुंडा, गुंडा, आतां तूं माझ्याशीं कसंरं बोलशील ? आतां मला 'आई' कसा म्हंगशील ? तुझं ते पहिल बोल व्हतं. ( गुंडा छातीवर हात ठेवतो व बोटं हालवून ' आई ' हा शब्द काढल्यासारखं दाखवतो. यल्ली रडूं लागते, फायरिंग सुरू होतें. यल्ली ओवाळणी आंब्याखालीं ठेवते. )

वि०:—आडोसा घ्या. बाजा, गोळ्यांचा पट्टा दे. बीरहो, फायर. ( दोन्ही बाजूंनं फायरिंग सुरू होतें. आंब्याच्या आडोशांत गुंडा निशाण दाखवतो. )

पो. ऑ०ः---झेंडा नीचा करो.

वीरः—झेंडा ऊंचा रहे हमारा.

पो. ऑ०ः---फुकट मराल.

वी०ः---करेंगे या मरेंगे. जय हिंद. वगैरे.

( दोन्ही बाजूनं फायरिंग सुरू होतं. गुंडाला गोळी लागते. तो खालीं पडतो. यल्ली त्याचं निशाण घेते. गुंडा निशाणाकडं पाहतो, आकाशाकडं पाहतो. हृदयावर हात ठेवून जयहिंद बोलण्याचं ॲक्टिंग करतो. )

बा०ः---गुंडा, कुस्ती अर्धी सोडतोस ! मरूं नगस. ( गुंडा मरतो. )

य०ः—कारभारी, काय केलंत हें ! या पांढऱ्या टोपीवाल्यांना स्वोराज्य मिळेल पन मला माझा गुंडा मिळणार नाय. तुमच्या इस्वासानं माझा इस्वासघात केला.

बा०ः—नग. त्यास्नी असं बोलूं नगस. हें आपलं कर्म हाय. रामकिस्न हरिचंदर होऊन गेले, कौरवपांडव होऊन गेले पन मरनाम्होरं कुनाचं चाललं नाय. या पिरथवींत कुनाचा वंशवेल अमर राहिलाय ! मग मी कोनच्या झाडाचा पाला ? वारं माझा भाद्दुर ! माझ्या आधीं आपला सबुद खरा केलास ! यल्ली रडूं नगस.

मं०ः---मागं हटा. गोळीबार चारी बाजूनं येऊं लागला आहे.

ली०ः—( निशाण घेऊन ) आम्ही हटूं. पण झेंडा हटणार नाहीं. ( झेंडा फडकावते. )

ली०ः—ऑं. ( जखमी होऊन खालीं बसते. )

श०ः—आम्ही खालीं पडूं. झेंडा पडणार नाहीं. ( झेंडा उचलतो व जखमी होऊन खालीं पडतो. )

वि०ः—दोघंहि जखमी झाले. यांना पडळींत न्या. ( खाशा वगैरे लीला, शरद् यांना पडळींत नेतात. )

बा०ः— (यल्लीला उद्देशून ) चल. पडळीच्या आसऱ्याला चल अगुदर. मग ते हायती न् मी. ( यल्लीला उठविण्याचा प्रयत्न करतो. )

य०:––मी नाय येत. मी माझ्या पुताला बवाळाया दिवा आनला. तो इझल्याच्या आंत माझा कुळदीपक इझला. मी हथंच मरनार.

बा०:––इस्वास, दुसरी फैर सुटायच्या आंत साबरापोतर मागं इटत जा न् तथं पुरांत उडी घाल. पुरान बेफाम झालेली किस्नामाई तुला पाखरासारी वाहून नेईल पैलथडीला या यमांच्या हातून. तूं आमचा पुढारी. त्यांत फरारी. तुझ्या जिवाची जोखीम आमच्यापरीस जास्त हाय.

वि०:––बाजा, हिंदुस्थानच्या आधीं गुंडा मरून स्वतंत्र झाला तसा मी पण होणार न् या गुलामगिरींतून सुटणार.

बाळि पाटीलः––( पडळीच्या दारांत येऊन ) विश्वास, विश्वास, माझ्या कलिजा, मागं फीर. तुझ्या कांग्रेसनं बाजाचा निर्वंश केला तसा ते माझा करतील. तूं मागं फीर. नाहींतर भिंतीवर डोकं आपटून मी कपाळ-मोक्ष करीन. ( बळि पाटील भिंतीवर डोकं आपटतो व बेशुद्ध होऊन खालीं पडतो. )

वि०:––बाबा, बाबा, काय केलंत ! ( विश्वास पडळीकडं जाऊं लागतो. बाजा त्याला पकडून मागं ओढतो. )

बा०:––तफडं जाऊं नगस. पोलिस तुला कोंडतील. आपला नदीचा रस्ता धर मुकाट.

वि०:––नाहीं. बाबांना टाकून मला जातां येणार नाहीं. ( विश्वास बाजाला हिसडा मारून पडळीकडं पळत जातो. मजूळ वगैरे त्याच्यामागं धांवतात व ते बळिपाटलाला पडळींत उचलून नेतात. )

बा०:––यल्ले, बाळिपाटलानं डोळं पांढरं केलं.

य०:––मरो तो बळिपाटील. त्याच्या कारर्थानं माझ्या लेकाला मारलं. कारभारी, ह्यो मरनाचं निशान हाय. त्याखाला मी मरनार.

( बाजा पडळींत जातो. यल्ली निशाण उचलते. )

य०:––हः हः हः ! ह्यो मरनाचं निशान हाय. मरना ये तर. बिगी बिगी ये. तुला मी आवतण देतें. काळ्या कुत्यांनो, दावा आतां तुमची

भाद्दुरी. बिनहत्त्यारीन् बायाबापडीपोरं त्यांच्यावर गोळ्या सोडनार तुम्ही. चालवा गोळी. अगं आईग! (खालीं पडते. गोळ्यांची आणखी फैर सुटते.) आरं मेल्यांनो, मेल्या मातींत किती गोळ्या घालतां? माझ्या बाळाची चाळण करून टाकलीय नुसती. आरं नामर्दांनो, तुम्हांला काय भ्या वाटतं माझ्या गुंडाचं कीं त्याचा मुडदा उठून बसंल म्हून. बाळा, तुला ह्यो निशान आवडत व्हतं. (त्याच्यावर निशाण पांघरते.) आरं किती गोळ्या सोडल्या तरी माझी माया पाखर ह्राय अझून. मी त्याच्यावर अशी पाखर घालीन. (त्याच्या अंगावर पडते न् मरते.)

मा०:—(आंब्याच्या आडून पोलिसांना खूण करतो.) सीज फायरिंग. तुम्हांला कांहीं माणुसकी आहे कीं नाहीं? मेल्या मुर्द्यांत किती गोळ्या घालतां? या दोघांच्या प्रेतांतून निदान पंचवीस तरी गोळ्या निघतील. खाशा, सत्तू, ही प्रेतं तिकडं उचलून ठेव. (खाशा, सत्तू प्रेतं उचलून घेऊन जातात. डी. एस. पी. रावबहाद्दूर वगैरे तिथं येतात.)

रा. ब०:—सगळ्या फरारी मर्दांची अशी खोड जिरली पाहिजे. खरं कीं नाहीं, मानेसाहेब?

मह्रा०:—(खादीचं पांढरं फडकं हालवीत प्रवेश करतात.) या गरीबांवर सूड घेऊन काय उपयोग! ज्यानं यांना चिथवलं त्या विश्वास पाटलाचा काटा काढला पाहिजे.

मा०:—पण तो आहे कुठं? भगीरथ प्रयत्न करीत आहें मी. परंतु त्याचं नख सुद्धां दिसलं नाहीं मला.

मह्रा०:—तो या पडळींत आहे याबद्दल मला बिलकुल शंका नाहीं. माझ्या अन्नसत्त्याग्रहाला भिऊन मला खंडोबाच्या घळींतून या पडळींत फटवाल्यांनीं आणून ठेवलं तेव्हां तिथं एक मरणोन्मुख म्हातारा होता. तोच बहुतेक विश्वास पाटलाचा बाप असावा. मघाशीं मी ओढ्यांत दबा धरून बसलों होतों तेव्हां तो म्हातारा 'विश्वास' 'विश्वास' म्हणून ओरडला व त्यानं भिंतीवर डोकं आपटून घेतलं, तेव्हां पडळींकडं पुष्कळ लोक धांवत गेले. त्यांत विश्वास पाटील असलाच पाहिजे.

डी. एस्. पी.:—अगदीं बरोबर आहे तुमचा कयास. प्रांतसाहेबांची चोरीला गेलेली मोटार ओढ्यांत पडली आहे. बहुतेक ते फराऱ्यांचंच काम असलं पाहिजे. सर्वजण पडळ वेढान् फायर करा. ( पोलिसांचं पडळीवर फायरिंग सुरू होतं. त्याला आंतून गोळ्यांच्या वर्षावानं उत्तर मिळतं. )

डी. एस्. पी:—आंब्याचा आसरा घ्या. सीज् फायरिंग. कटवाल्यां-जवळ स्टेनगन् आहे. आपलं त्यांच्यापुढं चालणार नाहीं. फक्त बंदुका रोखून पडळ वेढा. मी मिलिटरी मागवीत आहें.

मा०:—मिलिटरीचीन् लोकांची त्या तिकडं लढाई जुंपली आहे. तो लोकांचा लोंढा इकडं वळला तर आपली काय स्थिति होईल? तेव्हां मिलिटरी येईपर्यंत आपण बाजूला दडूं या.

डी. एस्. पी:—तशी वेळ आली तर या मोटारींतून निसटूं. पण फराऱ्याचा माग सोडायचा नाहीं. निर्वाणीचा उपाय म्हणजे माझ्याजवळ हँड ग्रेनेड आहे तो फेंकून मारीन.

रा. ब०:—मग फेंका. उशीर कां लावतां? सगळ्या राजद्रोह्यांच्या खिम्याचा गोळा बनेल.

डी. एस्. पी.:—( अंगावर शहारे आणतात. ) मला कटवाल्यांना जिवंत पकडायचं आहे.

( सर्वजण आंब्याचा आश्रय घेतात. पडळींतून बाजा हात वर करून येतो. )

रा. ब०:—बाजा, बिश्वास पाटलाला तूं पडळींत लपवून ठेवला आहेस.

बा०:—लपवून नाय कोंडून ठेवलाय. इस्वासचा बाप बळि पाटील, लेकाचा सोध करीत हयं आला. अगदीं मराया टेकला व्हता म्हातारा आन् आतां तो मेलाच. म्हून मीं त्याला ठेवून घेतला. पन मनात डाव धरून राहिलों बक्षिसाचा. म्हटलं एक दिस इस्वास म्हाताऱ्याला भेटायाला येनारच. आन् तो आलान् पक्का गावला कीं त्येची बातमी द्यायची पोलिसांत. पन माझ्या म्हारं हे कर्म वाढून ठेवलं व्हतं ना! माझ्या पोरालाच इस्वासनं फितुर केलान् माझं घर बुडावलं. मी त्येला आतां सोडीन!

महा०:—हा बाजा फराऱ्यांचा साथीदार आहे. खोटारडा कुठला !

बा०:—हा महासबुद नाय; पोकळ सबुद हाय. याच्यांत दिल् नाय. आरं लेका, माझीं बायकापोरं मारनाऱ्याला मी जीवदान देईन ! ह्ये रावभाद्दूर सांगतील माझा सबुद म्हंजी सबुद असतो.

रा. ब०:—अगदीं खरी गोष्ट. बाजाचा सबुद म्हंजी सबुद. माझ्या घरावर या महाशब्द्याच्या लोकांनीं डाका घातला होता व सगळं सोनं-नाणं धुऊन नेलं होतं परवांच्या दिवशीं. परंतु बाजानं वाटेल ती हिकमत योजून डाक्यांतील माझा सगळा माल रातोरात आणून दिला चोरावर मोर होऊन ! असा हा इमानी आहे.

डी. एस्. पी.:—तुम्हीच सांगतां म्हणून आम्ही हें खरं मानतों.

रा. ब०:—बाजा, भिऊं नकोस. तुला पांच हजारांचं सरकारी बक्षिस तर मिळेलच, परंतु मी तें बक्षिस वाढवून देईन. तुझं बायकोपोर मेलं त्यांची भरपाई करीन. माझा माल शोधून दिलास त्याचा निराळा हिशेब धरीन, परंतु कांहीं तरी करून त्या फराऱ्याला जिवंत पकडून दे.

बा०:—तें कसं देऊं ! त्या लोकांना माशिनच्या बंदुकांची मदत आली आहे. ते आपना समद्यांस्नीं मारून काढतील.

डी. एस्. पी.:—कांहीं तरी थाप मारून त्यांना बाहेर काढ.

बा०:—ते आपलं बारसं जेवल्यात. ते भाहिर निघायचं न्हायीत. आन् आपुन आपल्या जीवास्नी भेनार. आन् ते हायीत जिवावर उदार. तवा तुम्ही म्हंगतां तें कस जुळायचं ! पन येक मारग हाय. इस्वासानं तुम्हांला निरोप दिलाय. त्येचा फायदा घ्या, तुम्हास्नी पटल तर. दोन मिंटं दिल्यात त्यानं बोलणीं कराया. नाय तर उजून मारा सुरू करील.

रा. ब०:—छेः छेः ! अगदीं नादीं लागूं नका त्या फराऱ्याच्यान् वेळ घालवूं नका. बस्स. हँडग्रेनेड फेंका कीं सगळं काम होईल.

डी. एस्. पी.:—गप. काय निरोप आहे फराऱ्याचा ?

बा०: —तो म्हंगतो, 'तुम्ही मिलिटरी आनली तरी मी लढून मरंन. धरन

येनार नाय. पन माझ्या बापाची मौत झालीय. तवा मी खिडकींत उभा राहीन आन् तुम्हीं मला बापाचं सरन पेटवलेलं दावलंत डोळ्यांना तर बंदुक खालीं ठेवीन न् तुमच्या सवाधीन होईन. मातुर ह्ये समदं व्हईस-तंवर तुम्ही बंदुकीच्या गोळीच्या टप्प्याभाहिर उभं ऱ्हायलं पाहिजे.

मा०:—त्यांत काय अवघड आहे. आम्हीं वेढा दिलाच आहे. जरा मागं हटलं म्हणजे झालं.

डी. एस्. पी.: —पण बाळे पाटील मेलाय हें खरं कशावरून ?

बा०:—बिगर हत्त्यार होवून कुनीबी चला तुमच्यापैकीं माझ्या सबु-दावर. तुम्हांला धक्का लागला तर मी जिम्मेदार हाय.

रा. ब०:—बाजा, फरारी आतां पक्का सांपडला आहे. तुझ्या दगल-बाजीनं सुटला तर मी काय करीन माहित आहे ना ?

बा०:—माझ्या सबुदाम्होरं त्याची किंमत नाय मला.

डी. एस्. पी.:—बाळेपाटलाला अग्नि कुठं देणार ?

बा०:—त्या काय माझ्या जिवांच्या लोंधी ठेवल्यात साभरांत तथंच देऊं सरण पेटवून.

रा. ब०:—आणि येवढं होइस तों फरारी पडळींतून पळाला तर ?

डी. एस्. पी.:—पळतोय कसला ? अझून अंधार पडायाला पुष्कळ अवकाश आहे आणि पडळीला आमचा वेढा पक्का आहे. पलीकडून वर मावळांत पाऊस पडला त्याचा पूर चालला आहे बेफाम. परंतु बाजा, नीट ऐक. बाळेपाटलाचं प्रेत पडळीच्या बाहेर निघालं कीं तूं या आंब्या-जवळ येऊन उभा राहिला पाहिजेस. बनवाबनवी केलीस तर आम्ही तुला पकडूं. सरण तीन मिनिटांत पेटलं पाहिजे. (मनगटावरील घड्याळ पाहतो.) लोक पडळीबाहेर काढले कीं मी पुन्हां पडळींत जाऊं देणार नाहीं.

मा०:—मग आपल्या बापाच्या मौतीला अग्नि मिळाल्याची फराऱ्याची खात्री झाली आहे व तो आपल्या स्वाधीन होण्यास तयार आहे हें आप-ल्याला कसं कळेल ?

बा०ः—ह्यो निशाण हाय ना. फरारी पडळीच्या छपरांतून तें ढोसून भाहिर काढील न् इशारा देईल.

डी. एस्. पी.ः—शाबास. आम्ही गोळीच्या टप्प्याबाहेर त्या तिथं जातों. तुम्हीं प्रेत बाहेर काढलं कीं, मी मोठ्यानं अंक मोजून टाइम देईन. चला.

(बाजा निशाण उचलून पडळीकडं जातो. डी. एस्. पी. आपल्या लोकांना खूण करून पडद्यांत नेतो.)

बा०ः—(पडळीकडं जातां जातां) आना ती गाडी दारासमोर. (सत्तू, खाशा, गाडी ओढून आणतात.) भरा लाकडं. (लोक पडळीच्या आंत असलेलीं लांकडं बाहेर वाहून आणतात व गाडींत भरूं लागतात.) गेलं समदं लांब. आना त्येला भाहिर. (लोक विश्वासला प्रेतासारखं उचलून आणतात.)

मं०ः—गुलाल टाका तोंडावर. म्हणजे तोंड दिसणार नाहीं त्यांचं. (खाशा गुलाल टाकतो व लोक विश्वासला गाडींत निजवतात.)

बा०ः—पलिकडून वंडं लावा म्हंजी गोळीला आडोसा व्हईल.

मं०ः—पाटील, शेजारीं स्टेनगन न् भरलेला रिव्हाल्व्हर ठेवलाय. वेळ पडली तर या पोकळींत बसून मारा करा.

खा०ः—झेंडा कुठं हाय ?

स०ः—ह्या इकडं ठेवलाय गाडींत.

वि०ः—बाबांची माती कुठं आहे ?

बा०ः—लांकडांच्या मोळींत घालून तुमच्याच खालीं ठेवलीय.

वि०ः—अरे कर्मा !

मं०ः—बाजाबाबा, किती त्रास दिला आम्हीं. (रडते.)

बा०ः—चीप. तोंडांतून सबुद नाय काढायाचा. तुला रडायला येळ हाय. पन मला नाय. हाकला गाडी. (लोक गाडी ओढतात. मंजूळ गाडी-मागं जाते. बाजा आंब्याच्याजवळ येऊन उभा राहतो.)

डी. एस्. पी.:—( पडद्यांतून ) वन्.

बा०:—योक. हां. आटपा लवकर.

डी. एस्. पी.:—टू.

बा०:—सबूर. दोन.

डी. एस्. पी.:—थ्री.

बा०:—तीन. सबुर. सबुर. आंब्याच्या म्होरं याल तर फरारी गोळीबार करील.

डी. एस्. पी.:—( पडद्यांतून ओरडतो. ) मौतीचे लोक इकडं या दौडत. ( डी. एस्. पी. वगैरे लपतछपत आंब्याच्या आडोशाला येतात. )

डी. एस. पी.:—बाजा, दिलेला टाइम झाला.

बा०:—थांबा जरा. इकडं या. आतांशिक सरण पेटलंय. तें पघा. निघालंच लोक इकडं.

डी. एस. पी.:—कोण तो तरुण चितेला नमस्कार करीत आहे तो ?

बा०:—असेल त्यांच्यापैकींच कुनी साथीदार.

डी. एस. पी.—बाजा, सरण पेटल्याबरोबर झेंडयाचा इशारा पडळीकडून यायचा होता. झेंडा चितेशेजारीं कसा उभा राहिला ! आणि तो तरुण पण नाहींसा झाला !

बा०:—अवं मला इकडं ठेवलंत. तवा मी काय सांगनार ?

डी. एस. पी.:—पाय उचला. जलदी दौडो.

( मंजूळ वगैरे सर्वजण येतात. )

डी. एस. पी.—चितेला नमस्कार करीत होता तो तरुण कुठं आहे ?

मं०:—आम्हांला काय माहित ? तुमच्या शिपायांना बिचारा.

डी. एस. पी.:—चूप. स्त्री नसतीस तर अटक केली असती.

मं०—मग काय लाजतां ?

डी. एस. पी.—बाजा, फरारी कुठं आहे ?

बा०:—फरारी झाला.

रा. ब०:—बाजा, खरं सांग. नाहीं तर फरारीच्या फांसावर लटकशील !

बा०:—बाळि पाटलाला भाहिर काढिस तंवर तो आंत व्हता.

रा. ब०:—मग कुठं गेला ?

बा०:—मला काय माहित ! तो हवेंतून आलान् हवेंत गेला !

रा. ब०:—बाजा, बघ. सांगतों सगळं आतां.

बा०:—बेलाशिक.

रा. ब०:—साहेब, बाजा रामोशी निंबगांवकर तो हाच. हा स्वतः फरारी दरोडखोर आहे. पकडा ह्याला. ( पोलिस बाजाला पकडतात. )

पो०—बाजा, आतां तुझं मरण भरलं.

बा०:—मी मरतोय स्वोतंत्र्य मिळाल्याबिगर ! आरं मर्दा, त्येच्या-करतां मरसतोवर जगेन. मिशी पिळाया जरा हात सोडकी. सोडीत नाय ? बरं, फांशीचा खांब हतून कतिक लांब हाय ?

पो०:—पुष्कळ.

बा०:—मग नाय मरत मी. अझून फरारी व्हईन.

रा. ब०:—अरे जा. त्याच्या आंत तुला फांशीं देऊं.

बा०—जारे मांगाच्या पोरा. मला फांशीं दिलंस तर थतून फरारी व्हईन. आन् पुन्हा नाय सापडनार तुझ्या बाला.

डी. एस. पी.—बाजा, चल. तुझ्या लोकांचा निरोप घे.

बा०:—गांवकरी, रामराम.

गांवकरी:—बाजा, रामराम. ( रडतात. )

बा०:—या दंडास्नी काढण्या लावल्याती. नाय तर दोन्हीं हातांनीं रामराम घातला असता तुम्हांस्नी.

गांव०:—बाजा, नको बोलूंस. आम्ही समदं जानतों.

बा०:—इस्वासला निरोप सांगा कीं गुंडा, यल्ली न् बाजा यांनीं आपला सबुद खरा केला. या जगांत सबुदाइतकी कसालाबी किंमत नाय. उगीच नाय गांधीजीच्या सबुदावर चाळीस कोटि दुनिया हालत. आम्ही रामोशी हावूत. आम्हांला आमच्या सबुदाची किंमत आमच्या पराणापरीस जास्त हाय. त्याच्याशिवाय तुमची इद्या, शिक्षण, येद, पुरानं आन् गांधीबाबा बद्दलची बडबड फुकट हाय. त्याच्याबिगर तुमचं स्वोराज्यन् स्वोतंत्र्यबी फुकट व्हईल.

लोकः—( हात जोडून ) खरं हाय.

बा०:—गांवकरी, गांधीजींनी गरीबांचं राज्य करूं म्हून आपनास्नी सबुद दिलाय. मीं जसा माझा सबुद खरा करून दावला तसा तुम्ही त्यांचा सबुद खरा करून दावा. गरीबांचं राज्य करा. गांधीजींच्या सबुदाला बट्टा लावूं नका. गरीबांच्या सुखाम्होरं गुंडा-यल्ली-बाजा यांच्या पराणांची किंमत नाय. माझ्या गुंडासारं कतिक कवळं कोंब करपतात रोज या दुनियेंत. त्यांना वाढूं द्या. त्यांनाच मी आपला गुंडा समजंन न् सुखानं फांशीं जाईन. बाजाचा निर्वंश झाला पन देसाचा येल वाढूं द्या. त्याच्या वाळल्या येलाला फळं बांजूं द्या.

मं०:—बाजाबाबा, नका बोलूं. काळजाला घरं पडत आहेत.

शि०:—तो बघा लोकांचा जमाव इकडं येत आहे. तो इकडं आला तर आपला खिमा उडवील.

डी. एस. पी.:—चला लवकर.

रा. ब०:—फरारी अजून पडळींत आहे, त्याला टाकून !

डी. एस. पी.—आतां वेळ घालवला तर आपण मारले जाऊं. चला. ओढ्यांतली मोटार गांठूं या.

रा. ब०:—हातांतला हँडग्रेनेड फेंका की.

बा०:—( घाबरून ) नका, नका. आंत कुनी नाय. माझी झोंपडी तरी ठेवा शिल्लक.

रा. ब०:—लुच्चा आहे रामोशी.

बा०:—तुमास्नी फरारीच होवान्. तो बघा फरारी नदीची धार तोडीत चाललाय सोन्याच्या पान्यांतून,

रा. ब०:—सगळं खोटं आहे. फेंका हॅंडग्रेनेड.

बा०:—साहेब, नगा. आंत लीलान् शरद् हायती.

रा. ब०:—ते तर मोर्चा घेऊन गेले आहेत.

बा०:—पन अर्ध्या वाटेंतून परतले.

डी. एस. पी.—( मोठ्यानें ) कोण आहे आंत ? (आवाज येत नाहीं.)

रा. ब०:—हूं: कुणी नाहीं. या दरोडखोरावर काय विश्वास ठेवतां ! हा वेळ काढीत आहे. फेंका हॅंडग्रेनेड.

बा०:—अवं गोळ्या लागून बेसुध झाल्याती.

रा. ब०:—लबाड कुठला ! साहेब, यांत बिंग आहे. मोठी शिकार मिळेल तुम्हांला. आटपा. जमाव जवळ आला बघा.

( डी. एस. पी. हॅंडग्रेनेड फेंकतात. झोंपडी ढासळते. लीला व शरद् उडून मरून पडतात. )

मं०:—लीला, शरद्. ( पडळीकडं धांवत जाते. )

रा. ब०:—हायरे कर्मा ! काय केलं मीं ! ( खालीं बसतो. )

बा०:—एकुलत्याएक मुलीला मारलंस ? चांडाळा, आतां फकास्त उरावर धन घेऊन मर.

डी. एस. पी.:—तो झेंडा पडळीवर उभा करा. म्हणजे तो पाहून जमावाची चाल जरा मंद होईल. एकजण मोटार स्टार्ट करा.

( शिपाई पडळीवर झेंडा चढवती. )

बा०:—मंजूळ, गांवकरी, तुम्हांला स्वोतंत्र्य मिळालं म्हंजी बाजाची सय ठेवान् त्या रातीं या पडक्या पडळीवर एक पंती तरी लावा.

शि०:—बडबडूं नकोस. चल. ( पोलिस त्याला ढकलतात. )

बा०:—रामराम. ध्यानामंधी ठेवा माझा सबुद. गरीबांचं राज्य. आन् घ्या शपथ गरीबांचं राज्य करीन म्हून. घ्या शपथ. घ्या शपथ. घ्या. घ्या. गरीबांचं राज्य. माझा सबुद.

( बाजाला शिपाई पडद्यांत ओढीत नेतात. पडद्यांत राष्ट्रघोषणा होतात. पारदर्शक पडदा पडतो. माने, महाशब्दे, मंजूळ व रावबहाद्दुर पडळीवर एक पणती लावतांना दिसतात. मग सगळ्या पडळीवर, झाडावर, निवडुंगावर, खंडोबाची टेकडी व सह्याद्रीचे डोंगर यांवर रोषणाई होते. हिंदुस्थानचा नकाशा दिसतो व राष्ट्रगीत सुरू होतें. )

